





नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






आपण हिवाळ्यासारखे असायचे,
सारी पाने गळून
झाड ओकेबोके होताना पाहत,
**भयाने थरथरत, पण हताश नव्हे**

# भाषा आणि जीवन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष २७ ■ अंक १ ■ हिवाळा २००९

अनुक्रमणिका








मराठी अभ्यास परिषद

**संपादक :** प्र.ना. परांजपे

**संपादन-सल्लागार :** अशोक रा. केळकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण

**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरभाष (०२०) २५६९४६१७
ई-मेल pranaparanjpe@gmail.com भ्रमणभाष ९४२२५ ०९६३८

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद', ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२.
दूरभाष (०२०) २४४८ ६०१५ ई-मेल www.marathiabhyasparishad.com

**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे ४११ ०५१.
दूरभाष (०२०) २४३४ ८७५६

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी **पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर** असे आहे. वार्षिक वर्गणी- **संस्थेला** रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-. **व्यक्तीला** रु. १००/-; पंचवार्षिक वर्गणी रु. ४५०/- **परदेशात** अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. (पाठवल्यास आपला पत्ता पिनकोड क्रमांकासह न विसरता लिहावा.)** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत रुपये ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु. २,५००/-, अर्धे पान रु. १,५००/-, पाव पान रु. ८००/-, शुभेच्छा रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक : जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी)

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य रु. २५/-**

## अनुक्रमणिका


मुखपृष्ठावरील कविता : प्रभा गणोरकर
मांडणी : विनय सायनेकर, सुप्रिया खारकर

# अभिनंदन

**(१) डॉ० अशोक रा. केळकर**

मराठी अभ्यास परिषदेचे पहिले अध्यक्ष व 'भाषा आणि जीवन'चे पहिले संपादक डॉ० अशोक रा. केळकर यांना अलीकडेच दोन पुरस्कार मिळाले : महाराष्ट्र साहित्य परिषदेचा पहिला डॉ० गं. ना. जोगळेकर स्मृतिपुरस्कार आणि भारतीय विद्याभवन व ॲडव्होकेट डी.आर. नगरकर फाऊंडेशन यांचा पुरस्कार व सुवर्णपदक. 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांना डॉ० केळकरांची ओळख नव्याने करून देण्याची गरज नाही. भारत सरकारने 'पद्मश्री' हा पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला आहे. इंग्रजी, मराठी व हिंदी या तिन्ही भाषांत त्यांनी लेखन केले असून आत्तापर्यंत त्यांची तेरा पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यांच्या पुस्तकांनाही अनेक पुरस्कार मिळाले आहेत. मराठी भाषेच्या अभ्यासकांच्या दृष्टीने त्यांची 'वैखरी', 'मध्यमा', 'मराठी भाषेचा आर्थिक संसार' ही पुस्तके विशेष महत्त्वाची आहेत. त्यांच्या अलीकडेच प्रकाशित झालेल्या 'रुजुवात' या देखण्या ग्रंथात त्यांचे साहित्यविषयक आस्वाद, समीक्षा व मीमांसा करणारे लेख एकत्रित करण्यात आले आहेत.

डॉ० केळकरांचे मन:पूर्वक अभिनंदन !

**(२) डॉ० मॅक्सीन बर्नसन**

मराठी अभ्यास परिषदेच्या एक संस्थापक-सदस्य डॉ० मॅक्सीन बर्नसन यांना सहकार महर्षी शंकरराव मोहिते पाटील प्रतिष्ठानतर्फे १४ जानेवारी, २००९ रोजी जीवन-गौरव पुरस्कार देण्यात येणार आहे.

संपादक

**मुखपृष्ठासंबंधी :**

या अंकाच्या मुखपृष्ठावरील कविता प्रभा गणोरकर यांच्या 'विवर्त' या संग्रहातून घेतली आहे. गेली काही वर्षे भारतावर असलेले दहशतीचे सावट २६ नोव्हेंबर २००८च्या मुंबईवरील हल्ल्याने गडद झाले आहे. परस्परविश्वास, भिन्नमतसहिष्णुता, स्वातंत्र्याची आच आणि एकात्मता असे समाजवृक्षाचे अनेक आधार कोसळत आहेत. अशा परिस्थितीत भयामुळे थरकाप झाला तरी हताश न होता आपआपल्या क्षेत्रांत आपआपल्या ताकदीनिशी लढत राहणे एवढेतरी आपण नक्कीच करू शकतो.

# मराठी भाषेच्या विकासाच्या वाटा - ७ : मराठीसाठी स्वतंत्र विद्यापीठ

संस्कृत ही एक अभिजात भाषा आहे हे आपल्याला माहीत आहे. अभिजात म्हणजे 'क्लासिकल' ! दोनतीन हजार वर्षांची परंपरा असलेली संपन्न भाषा. तिचे अध्ययन, अध्यापन, संशोधन, जतन, ग्रंथ-प्रकाशन इत्यादींसाठी केंद्रसरकार कोट्यवधी रुपयांचे अनुदान देते. त्यामुळेच महाराष्ट्रात रामटेक येथे स्वतंत्र विद्यापीठ आहे आणि डेक्कन कॉलेजातील संस्कृत शब्दकोशासारखे अनेक प्रकल्प भारतात चालू आहेत.

काही वर्षांपूर्वी आणखी एका भारतीय भाषेला अभिजात भाषेचा दर्जा देण्यात आल्याचे केंद्र शासनाने जाहीर केले; ती भाषा म्हणजे तमीळ. भाषा 'अभिजात' आहे की नाही हे ठरवण्याचे काही निकष केंद्र शासनाने निश्चित केले आहेत. त्या निकषांवर, म्हणजे प्राचीनता, संपन्न वाङ्मयीन परंपरा इत्यादी, तमीळ उतरते हे खरेच आहे. आणि आता - दोन महिन्यांपूर्वी - केंद्र शासनाने कन्नड व तेलुगू या भाषांनाही अभिजात भाषेचा दर्जा दिल्याचे जाहीर केले आहे. त्यामुळे या भाषांच्याही अध्ययन-अध्यापन-संशोधन-जतन-प्रकाशन इ०साठी कोट्यवधी रुपयांचे अनुदान प्राप्त होईल.

अर्थात हे आपोआप घडलेले नाही; किंवा केंद्र शासनाने हे आपणहून, स्वयंप्रेरणेने केलेले नाही. या भाषांच्या अभिमान्यांनी, अभ्यासकांनी, राजकीय पुढाऱ्यांनी व राज्य सरकारांनी योजनापूर्वक व एकजुटीने त्यासाठी प्रयत्न केले होते. उदाहरणार्थ हैदराबादेच्या पोट्टि श्रीमुलू तेलुगू विद्यापीठाने गेली तीन वर्षे केलेल्या प्रयत्नांचा हा गोषवारा पाहा :

१. ''तेलुगू अभिजात भाषा आणि दुसरी अधिकृत शासकीय भाषा'' या विषयावर ८ जानेवारी २००६ रोजी एक दिवसाचे चर्चासत्र. त्याला दासरी नारायण राव, विठ्ठल राव, वाय. व्यंकटेश्वर रेड्डी, डी. देवेन्द्र गौड, सुधाकर रेड्डी आणि वरिष्ठ पत्रकारांची उपस्थिती. तेलुगूला अभिजात भाषेचा व अधिकृत द्वितीय शासकीय भाषा म्हणून मान्यता मिळावी यासाठी प्रयत्न करण्याचा प्रस्ताव एकमताने संमत.
२. आन्ध्र प्रदेशातील आणि प्रदेशाबाहेरील सांस्कृतिक आणि साहित्यिक संस्थांना चर्चासत्रे आयोजित करून तेलुगूचा समावेश अभिजात भाषांमध्ये करण्याचे प्रस्ताव



अनुक्रमणिका

संमत करण्याची विनंती. त्या विनंतीला प्रतिसाद म्हणून देश-परदेशांतील अनेक संस्थांनी तसे ठराव केले.

३. आंतरराष्ट्रीय मातृभाषा-दिनाचे औचित्य साधून २० व २१ फेब्रुवारी २००६ रोजी ''तेलुगू - एक अभिजात भाषा'' आणि ''विविध क्षेत्रांतील तेलुगूचा वापर'' या विषयांवर एक राष्ट्रीय चर्चासत्र आयोजित केले. भाषाविज्ञान, इतिहास, संस्कृती आणि वाङ्मय या क्षेत्रांतील अनेक विद्वानांनी त्यात भाग घेतला आणि तेलुगूचा अभिजात दर्जा लेखी पुरावे देऊन प्रस्थापित केला.

४. पंतप्रधान, मनुष्यबळविकास खात्याचे मंत्री, राज्यमंत्री यांना विद्यापीठाच्या कुलगुरू अवुला मंजुलता भेटल्या आणि त्यांच्यापुढे त्यांनी तेलुगूच्या अभिजात दर्जाबद्दलचा युक्तिवाद सादर केला.

५. विद्यापीठाच्या भाषा विकास विभागातील प्राध्यापकांनी मनुष्यबळ विकास खात्याला सादर करण्यासाठी तेलुगूचा अभिजात दर्जा सिद्ध करणारी कागदपत्रे तयार करण्यात भाग घेतला.

यात मराठीला शिकण्यासारखे बरेच आहे. मुख्य म्हणजे मराठीसाठी एका स्वतंत्र विद्यापीठाची आवश्यकता आहे. सध्या अस्तित्वात असलेल्या विद्यापीठांमध्ये मराठी विभाग आहेत; पण मराठी भाषेच्या विकासासाठी ते काही फारसे करीत आहेत, किंवा त्यांना काही फारसे काही करता येईल असे दिसत नाही. एक तर या विद्यापीठांचे (एक अपवाद वगळता) कुलगुरू भाषाविषयांचे नाहीत. बहुतेक वेळी त्यांतील बहुसंख्य कुलगुरू विज्ञान विषयांचे असतात. त्यामुळे विद्यापीठातील भाषा विभागांना - आणि त्यांतही मराठी विभागांना - प्राधान्य मिळणे दुरापास्त असते. मराठी विभागांना मनुष्यबळ, आर्थिक बळ, त्यांच्या योजनांचा विद्यापीठ अनुदान आयोग व राज्यशासन यांच्याकडे पाठपुरावा इत्यादींची चणचण भासते. शिवाय हे विभाग मुख्यत: साहित्यावर भर देतात. उपयोजित मराठी, मराठीचे भाषाविज्ञान अशा एकदोन प्रश्नपत्रिका वगळल्यास मराठी भाषेशी भाषा म्हणून त्यांना फारसे कर्तव्य नसते. तिसरी गोष्ट अशी की शासनाने अध्यापकांच्या संख्येचा संबंध विद्यार्थिसंख्येशी जोडलेला असल्यामुळे मराठी भाषेविषयीचे विविध अभ्यासक्रम या विभागांनी ठरविले तरी त्यांना ते राबवता येत नाहीत. यापेक्षाही दुर्दैवाची गोष्ट अशी महाराष्ट्रात-अगदी महाराष्ट्र शासनातही - नोकरी मिळवण्यासाठी निर्दोष, चांगले मराठी येत असण्याची सक्ती नाही. त्यामुळे मराठी भाषाविषयाकडे विद्यार्थी वळत नाहीत. आणखी एक दुर्दैवाची बाब अशी की महाराष्ट्रातील विद्यापीठांमधील भाषाविज्ञान विभागांत भाषाविज्ञानाचे अध्यापन मराठीतून केले जात नाही. त्यामुळे पुण्यातील डेक्कन कॉलेजात भाषाविज्ञानाचे अध्यापन सुरू



अनुक्रमणिका

झाले या गोष्टीला पन्नास वर्षे होऊन गेली तरी मराठी आणि भाषाविज्ञान यांची सांधेजोड अद्यापीही समाधानकारकपणाने झालेली नाही. सामान्य भाषाविज्ञान, वर्णनात्मक भाषाविज्ञान, तौलनिक भाषाविज्ञान, उपयोजित भाषाविज्ञान, संस्कृतिलक्षी भाषाविज्ञान, सामाजिक भाषाविज्ञान अशा भाषाविज्ञानशाखांचा परिचय मराठीच्या अभ्यासकांना झाल्याशिवाय भाषेचा विकास, भाषा आणि समाज यांच्यातील आंतरिक संबंध, प्रमाणभाषा, बोलीभाषा, विविधस्तरांवरील भाषेच्या अध्यापनाची तत्त्वे व पद्धती इत्यादी गोष्टींचे संशोधन व वास्तव आकलन कसे होणार ? आज समाजात भाषेबद्दलची बेफिकिरी व भाषेबद्दलचा असमंजस अतिरेकी अभिमान अशा दोन परस्परविरुद्ध टोकाच्या प्रतिक्रिया आढळतात. त्या प्रतिक्रियांना मराठी विभाग तरी कसे अपवाद असणार ?

यावर कुणी म्हणेल की सध्याच्या मराठी विभागांतच मराठी भाषेचे अभ्यासक्रम सुरू करावेत. किंवा फार तर वेगळे मराठी भाषा विभाग सुरू करावेत. पण विद्यापीठांची प्रकृती, त्यांचे कायदे, त्यांच्यावरील बंधने इत्यादी गोष्टी विचारात घेतल्या तर सध्याच्या विद्यापीठांतील मराठी विभागांना किंवा राज्य मराठी विकास संस्थेलाही मराठीच्या विकासासाठी फारसे काही करता येईल असे वाटत नाही.

म्हणून मराठीसाठी वेगळ्या, स्वतंत्र विद्यापीठाची आवश्यकता आहे.

या विद्यापीठात मराठी भाषा, मराठी समाज, मराठी संस्कृती, मराठी भाषा-समाज-संस्कृतीचा इतिहास, भाषाविज्ञान, ललित कला, प्राथमिक व माध्यमिक स्तरावरील मराठीचे अध्यापन अशा विषयांच्या संशोधनावर भर असावा. पाहण्या करून त्यांचे विश्लेषणात्मक अहवाल तयार करण्यावर भर असावा. विद्यार्थी नोंदवणे, परीक्षा घेणे आणि पदव्या देणे ही कामे सध्याची विद्यापीठे करीतच आहेत. मराठी विद्यापीठाने या गोष्टी निदान प्रारंभीची पाचसात वर्षे तरी करू नयेत. मराठीच्या विकासाचा आराखडा तयार करणे, त्याच्या अंमलबजावणीसाठी शासन, खासगी संस्था व व्यक्ती यांच्याकडून आर्थिक व बौद्धिक साधनसामुग्री उभी करणे, प्रकल्पांची आखणी करून त्यांच्या अंमलबजावणीवर देखरेख करणे, भाषेचा वापर, प्रकाशने इत्यादींबाबत संकेत निर्माण करणे अशा उद्दिष्टांवर मराठीच्या विद्यापीठाने लक्ष केंद्रित करावे.

भाषेच्या विकासाच्या बाबतीत दक्षिणेतील राज्ये योजनापूर्वक कार्य करीत आहेत. तमीळ, तेलुगू व कन्नड या भाषांसाठी वेगळी विद्यापीठे प्रस्थापित झालेली आहेत. तेथील शासन, राजकीय पुढारी, साहित्यिक, विद्वान अभ्यासक त्यांना एकजुटीने पाठबळ देत आहेत. त्या भाषांना अभिजात भाषेचा दर्जा मिळाला याचे त्यामुळे आश्चर्य वाटू नये. ■

प्र. ना. परांजपे

# तपोनिधी रवीन्द्र राजाराम शेणवी केळेकर

प्रियदर्शिनी तडकोडकर

भारतीय साहित्य क्षेत्रातील सर्वोच्च सन्मानाचा ४२वा 'ज्ञानपीठ' पुरस्कार नामवंत गोमंतकीय साहित्यिक व गांधीवादी विचारवंत पद्मभूषण रवीन्द्र राजाराम केळेकर यांना जाहीर झाला आहे. हा पुरस्कार २००६ सालासाठीचा आहे. तो संस्कृत साहित्यिक सत्यव्रतशास्त्री यांच्या सोबत विभागून प्रदान केला जाणार आहे. केळेकर यांच्या द्वारे खरे तर आपल्यालाच हा पुरस्कार लाभला असल्याचा अनुभव समस्त गोवेकर घेताहेत. लेखक या नात्याने केळेकर श्रेष्ठ आहेतच; परंतु त्यांना एक विचारवंत व तत्त्वज्ञानी या उपाधींनीही संबोधले जाते. त्यांनी आयुष्यभर जी तपश्चर्या केली त्याची ही पावती आहे असेच म्हणावे लागेल. या पुरस्कारामुळे कोंकणी साहित्याला इतर भाषांतील साहित्याप्रमाणे 'ज्ञानपीठ' पुरस्कार संपादण्याची क्षमता आहे हे सिद्ध झाले आहे.

रवीन्द्र केळेकरांना (जन्म ७ मार्च १९२५) या वर्षाच्या आरंभीच भारत शासनातर्फे 'पद्मभूषण' हा मानाचा किताब प्रदान केला गेला. त्याही अगोदर (२००७) साहित्य अकादमीच्या 'महत्तर सदस्यता' (फेलोशिप)चा लाभ झाला होता. भारतीय भाषा संस्थान, म्हैसूर यांचा 'भाषा भारती सन्मान' (२००७) मिळवणारे ते एकमेव कोंकणी लेखक आहेत. कोंकणी भाषा मंडळ, मडगांवचा पुरस्कार, गोवा कला अकादमीचा 'साहित्यरत्न' पुरस्कार, गोवा शासनाचा 'गोमंत शारदा' सन्मान, स्वामी प्रणवानंद पुरस्कार, गोवा शासनाचाच सांस्कृतिक पुरस्कार असे अनेक एकापेक्षा एक सरस पुरस्कारांचे ते धनी आहेत.

साहित्य अकादमी (नवी दिल्ली)चा उत्कृष्ट साहित्यकृतीचा पुरस्कार मिळवणारे कोंकणीतील ते पहिले साहित्यकार. 'हिमालयात' या त्यांच्या प्रवासवर्णनाला १९७५ साली तो पुरस्कार प्राप्त झाला. नेहरू, सर्वपल्ली राधाकृष्णन्, काकासाहेब कालेलकर, भीष्म सहानी, कोविलन्, यू. आर. अनंतमूर्ती ह्या आणि अशासारख्यांच्या बरोबरीने वावरण्याचा साहित्य अकादमीच्या महत्तर सदस्यत्वाचा मान गोमंतकीय केळेकरांना मिळाला हे केवढे कोंकणीचे भाग्य ! त्यांच्या साहित्यिक कर्तृत्वाचा हा जसा बहुमान आहे तसा कोंकणीच्या साहित्यिक कुवतीचाही तो बहुमानच आहे. भारतातील फक्त

२१च श्रेष्ठ साहित्यिक या सन्मानासाठी अकादमी निवडते आणि त्यातील कुणाच्याही निधनाने मोकळी झालेली जागा भरून काढते. म्हणूनच हा सन्मान बहुमानाचा आणि प्रतिष्ठेचा मानतात.

शणै गोंयबाब यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या इतक्याच सक्षमतेने, निष्ठेने आणि निर्धाराने कोंकणीची धुरा आपल्या खांद्यावर पेलली ती रवीन्द्र केळेकरांनी. ते १९५०च्या आसपास कोंकणीच्या कार्यासाठी पूर्णवेळ कोंकणीला वाहून घेतलेले कार्यकर्ते होते.

काकासाहेब कालेलकरांच्या सान्निध्यात असताना १९५३ साली 'मीर्ग' (मृग) हे पाक्षिक त्यांनी सुरू केले. त्याच्या पहिल्याच संपादकीयात त्यांनी लिहिले होते की, ''कोंकणीविषयी आम्हाला जी भक्ती वाटते तेवढ्यासाठी तिची जमेल तशी सेवा करण्यासाठी म्हणून आम्ही हे पाक्षिक सुरू करत आहोत.''

दोन वर्षे वर्ध्याला राहून ते मुंबईला गेले. तेथे गोव्याच्या मुक्ती-संग्रामाची चळवळ जोरकसपणे चालूच होती. तेथेच त्यांनी 'गोमंत भारती'ची स्थापना केली. तिच्या माध्यमातून त्यांनी गांधी-साहित्याच्या कोंकणी अनुवादाचा प्रसार व प्रचार केला.

१९६१ साली गोवा मुक्त झाला आणि कोंकणीसह रवीन्द्रांच्या कार्याचा केंद्रबिंदू गोवाच झाला. कोंकणी भाषेसह गोव्याचीही नामोनिशाणी पुसून टाकण्यासाठी गोव्याचे महाराष्ट्रात विलीनीकरण करावे हा हेतू डोळ्यांसमोर ठेवून गोव्यात एक मोहीम सुरू झाली. त्या वेळी हातात लेखणी घेऊन गोव्यासाठी झुंजणारे झुंजारी बनून ते उभे राहिले. कोंकणीसाठी आणि कोंकणीतूनच लिखाण करायचे एकमेव व्रत त्यांनी आपले मानले. कोंकणी ही कोणत्याही भाषेची बोली नसल्याने ती स्वतंत्र साहित्यिक व विधिमान्य राजभाषा व्हावी, तसेच कोंकणीचे वेगळे स्वतंत्र राज्य व्हावे असे शणै गोंयबाबांचे स्वप्न होते. ते सफल झालेले पाहण्याचे भाग्य केळेकरांना याचि देही, याचि डोळा लाभले. हे घडण्यासाठी ते गेली सहा दशके समाजप्रबोधन करत आहेत.

रवींद्रबाब म्हणजे कोंकणी आणि कोंकणी म्हणजे रवींद्रबाब असे अलिखित समीकरण जे त्या वेळी बनले होते ते आजतागायत कायम आहे. व्यासंगी वाचक आणि अभ्यासक, स्वातंत्र्य-सेनानी, ध्येयवादी राजकारणी, समाजप्रबोधक, गांधी-जीवनाचे भाष्यकार व समर्थक, चरित्रकार, देशी भाषांसहित परकीय भाषांशी परिचित असल्याने त्या तत्त्वज्ञानाचीही ओळख असणारे, त्याचबरोबर भारतीय तत्त्वज्ञानाचे गाढ प्रवर्तक, सर्वधर्मसमतावादी समन्वयक, गांधीयुगातल्या महान व्यक्तिमत्त्वांचा निकट सहवास लाभलेले व त्यांच्या प्रभावातून घडलेले, संस्कृतिसेवेची दीक्षा घेतलेले, महाभारताचे अनुसर्जक, भारतीय प्रज्ञावाद बुद्धिवाद्यांना समजावून सांगणारे, प्रवास-वर्णने, रोजनिशी, ललितनिबंध लिहून साहित्यसेवा करणारे, हिंदी, गुजराती, पोर्तुगीज

भाषेतील निवडक साहित्य कोंकणी वाचकाला उपलब्ध करून देणारे भाषांतरकार, कोंकणी वाचकांना नक्षत्रविद्येचा परिचय सुलभतेने करून देणारे अशी त्यांची नानाविध रूपे मी आजवर पाहात आले आहे.

वयाच्या ८३व्या वर्षीही त्यांची लेखणी तेजाने तळपते आहे. त्यांना मिळालेला 'ज्ञानपीठ' पुरस्कार पुन्हा एकदा सिद्ध करतो की, प्रत्येक भाषा - मग ती लहान वा मोठी असो, विकसित वा विकसनशील - ही स्वयंपूर्ण आणि स्वयंभू असते. तिच्यातल्या क्षमतेला चालना मिळाल्यास ती इतर कोणत्याही प्रगत भाषांइतकीच समृद्ध होऊ शकते. त्यामुळे आज 'ज्ञानपीठ' मिळवलेली ही भाषा आणि तिच्यातील लेखक यापुढे 'नोबेल' वा तत्सम सर्वोच्च पुरस्कार मिळवेल यात आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. ■

**कोकणी विभाग, गोवा विद्यापीठ, ताळगाव पठार, तिसवाडी, गोवा** 403 206
**दूरभाष** 0832-6519292

[ श्री० रवीन्द्र केळेकर मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सभासद आहेत. याचा आम्हाला आनंद वाटतो. - संपादक ]

## दुर्मीळ होत चाललेली पुस्तके उपलब्ध

प्रा० कृ. श्री. अर्जुनवाडकरांचा संस्कृतचा व्यासंग आणि मराठी व्याकरणावरचा अधिकार मराठीच्या सर्व अभ्यासकांना ज्ञात आहे. मोरो केशव दामल्यांच्या व्याकरणाचे त्यांनी संपादन केले. देशमुख आणि कंपनीने प्रकाशित केलेला तो ग्रंथ आता दुर्मीळ आहे. प्रा० अर्जुनवाडकरांनी मराठी व्याकरण हा विषय मुंबई विद्यापीठात अनेक वर्षे शिकवला आहे. मराठी व्याकरणावर त्यांनी आणखी दोन पुस्तके लिहिली असून तीही आता दुर्मीळ होण्याच्या मार्गावर आहेत. त्या पुस्तकाच्या प्रत्येकी सहा प्रती त्यांनी मराठी अभ्यास परिषदेला देणगी म्हणून दिल्या आहेत. ज्या अभ्यासकांना ही पुस्तके हवी असतील त्यांनी त्यांच्या किंमतीएवढी रक्कम मराठी अभ्यास परिषदेकडे मनिऑर्डरने पाठवल्यास ती आम्ही (आमच्या खर्चाने) पाठवू.

**मराठी व्याकरणाचा इतिहास** : पृष्ठे ४१५. डेमी आकार. डीलक्स आवृत्ती : रु. ३५०/- साधी बांधणी : रु. ३००/-
**मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद** : पृष्ठे २३०. डेमी आकार. रु. १००/-
मराठीच्या अभ्यासक व अध्यापकांकडे ही पुस्तके असायलाच हवीत.

**आदरांजली**

# गुरू रोहिणी भाटे ऊर्फ 'बेबीताई'

**हेमा गाडगीळ**

गुरू रोहिणी भाटेंच्या ११ ऑक्टोबरला झालेल्या निधनाने एक पर्व संपुष्टात आले. त्या वेळी त्यांचं वय ८४ होतं. गेली पाच वर्षे त्या पार्किन्सनसारख्या दुर्धर व्याधीने क्षीण झाल्या होत्या. तरीही त्यांच्याशी बोलताना भूतकाळातल्या अनेक घटनांना त्या सहज उजाळा देऊ शकायच्या. परिचित व्यक्तींसंबंधीच्या आठवणीदेखील त्यांच्या स्मरणात ताज्या होत्या. यात त्यांच्या जिद्दी स्वभावाचा प्रत्यय येई.

आम्हा विद्यार्थिनींना त्यांचं अनेक पैलूंनी नटलेलं समृद्ध व्यक्तिमत्त्व 'गुरू' म्हणून लाभलं हे खरंच मोठं भाग्य. बेबीताईंनी केवळ पारंपरिक शास्त्रशुद्ध नृत्याचे शिक्षण दिलं नाही तर त्या पलीकडे जाऊन आम्हाला या अभिजात नृत्यकलेचा सर्वांगीण विचार करायला शिकवलं. त्याबरोबर कथक नृत्यशैलीचा मोठा सांस्कृतिक वारसा आमच्यापर्यंत पोचविला.

बेबीताईंचा जन्म १९२४मध्ये पाटण्याला एका अत्यंत पुरोगामी घरात झाला. परंतु शिक्षण मात्र पुण्यात झाले. त्यांनी जयपूर घराण्याच्या श्री० मोहनराव कल्याणपूरकरांकडे नृत्याचे धडे घेतले. नंतर लखनौ घराण्याच्या पं० लच्छूमहाराजांकडे तालीम घेतली. या कलेत अथक परिश्रमानं प्रावीण्य मिळवताना त्यांनी ताल आणि अभिनय या कथक नृत्याच्या दोन महत्त्वाच्या अंगांचा सखोल विचार केला आणि जुन्या साहित्याचा प्रदीर्घ अभ्यासही. संगीतासाठी त्यांनी श्री० केशवराव भोळे आणि पं० वसंतराव देशपांडे यांना गुरू केले.

त्यांच्या व्यासंगी व्यक्तिमत्त्वाचा पुण्याच्या त्या काळच्या समाजात एक सुंदर प्रभाव पडला. बेबीताईंसारख्यांनी नृत्याला वाहून घेण्यामुळे आपल्या संस्कृतीचा हा अमूल्य ठेवा लोकमान्य आणि सन्मान्य झाला. त्यांच्यातल्या कलासक्त अभ्यासकाने या दुर्लक्षित विषयाला एक वैचारिक बैठक दिली. त्यांनी अनेक प्रतिभासंपन्न अशा नृत्यरचना केल्या. त्यात १३ नृत्यनाटिका आहेत. त्यांनी सादर केलेले 'गीत-गोविन्द' आजही सुजाण प्रेक्षकांच्या आठवणीत असेल. बेबीताई वरदहस्त लेखिका होत्या. त्यांनी आपल्या शैलीदार मराठीत अनेक पुस्तकं आणि इतर लेखन केलं आहे. त्यात 'माझी

नृत्यसाधना' हे आत्मचरित्र त्यांच्या एका ध्येयाने झपाटलेल्या जीवनाचा मागोवा घेतं तर 'कथक दर्पण दीपिका' व 'लहेजा' हे संशोधनात्मक ग्रंथ त्यांच्या व्यासंगाचा परिचय करून देतात.

अलीकडच्या काळात बेबीताईंनी पुणे विद्यापीठाच्या ललित कला केंद्राच्या उभारणीत मोलाचे योगदान दिले. पाच तपांहून अधिक असलेल्या नृत्यसाधनेत त्यांनी मोठाच सर्जनशील शिष्यवर्ग तयार केला. देशी-विदेशी कार्यक्रम करून कलामहोत्सव भूषवले. बेबीताईंना अनेक सन्मान मिळाले; त्यात कालिदास पुरस्कार, महाराष्ट्र गौरव पुरस्कार, २००६ मध्ये मिळालेली संगीत नाटक ॲकाडमीची शिष्यवृत्ती विशेष उल्लेखनीय आहेत.

रोहिणी भाटे मराठी अभ्यास परिषदेच्या आजीव सभासद होत्या.

■

'सावित्री', १८ तपोभूमी सोसायटी, दत्तवाडी, पुणे 411 030.
दूरभाष (020) 2433 6691 / 99237 17454

## आवाहन

मराठीबद्दल आस्था असणाऱ्या, मराठीचे अध्ययन-अध्यापन करणाऱ्या, मराठीच्या विकासासाठी प्रयत्न करू इच्छिणाऱ्या सर्वांपर्यंत 'भाषा आणि जीवन' हे नियतकालिक आणि ते प्रकाशित करणाऱ्या 'मराठी अभ्यास परिषदे'चे कार्य पोचणे आवश्यक आहे, हे आपल्यालाही पटेल. त्यासाठी आपणही काही करू शकता. आपण रु. १०००/- (किंवा त्या पटीने) देणगी दिलीत तर 'भाषा आणि जीवन'चे अंक दहा (किंवा त्या पटीत) संस्थांना (महाविद्यालये, विद्यापीठे यांचे मराठी विभाग इ०) किंवा व्यक्तींना एक वर्षभर पाठविले जातील. त्यांना पाठविल्या जाणाऱ्या पत्रात आपल्या देणगीचा उल्लेख केला जाईल आणि 'भाषा आणि जीवन'चे वर्गणीदार होण्याचे आणि (व्यक्तींना) 'मराठी अभ्यास परिषदे'चे आजीव सभासद होण्याचे आवाहन केले जाईल. अंक ज्यांना पाठवायचे त्यांची नावे व पत्ते आपण देऊ शकता किंवा ते काम आपण आमच्यावर सोपवू शकता.





अनुक्रमणिका

# छदाम

ब्रह्मानंद देशपांडे

१. छोटे नाणे

छदाम म्हणजे एक क्षुद्र किमतीचे नाणे हा अर्थ सर्वश्रुत आहे. मी तुझा एक छदामही देणे लागत नाही या वाक्प्रचारात तो येतो. दाते - कर्वे कोश, मराठी व्युत्पत्तिकोश आदि कोशांमधून आणि हिंदी कोशांमधूनही हाच अर्थ सामान्यतः दिलेला असतो. क्वचित् छदाम म्हणजे दोन दमड्यांचे नाणे, वा पैशाचा पाव भाग असेही अर्थ दिलेले आढळतात; पण ते कशाच्या आधारावर ते कळत नाही.

२. महदाईसांचे वस्त्र

श्रीचक्रधरप्रभूंचे वास्तव्य भडेगाव (तालुका पाचोरा, जिल्हा जळगाव) येथे असताना त्यांची भक्त महदाइसा हिला स्वामींना एक वस्त्र अर्पण करावे अशी इच्छा झाली.[१] तिच्याजवळ सोळा दाम होते. तिने आपले मनोगत आपले पूर्वीचे गुरू रामदेव दादोस यांना सांगितले. रामदेव दादोस याने यात कोलदांडा घातला. (अशा रामदेवाचे मुकुंदराजांचे गुरू रघुनाथ अथवा रामचंद्र - ज्याला मुकुंदराज 'समदृष्टि महेशानु', 'निष्कलंक चंद्र' असे गौरवितात - याच्याशी ऐक्य कल्पिणे हा संशोधन क्षेत्रातील मोठा विनोद होय). दादोसाने महदाइसेला स्वामींचे ठायी उपहार कर असे उचकाविले. शेवटी तिने स्वामींनाच विचारले. त्यांनी 'वस्त्रच घ्या' असे सांगितले. स्वामींच्या कृपाप्रसादाने तिला एक आसू किमतीचे वस्त्र सोळा दामात मिळाले. ते तिने स्वामींना अर्पण केले. स्वामी ते वस्त्र पांघरून बसले होते. तो दादोस आले. स्वामींनी वस्त्राचा पदर त्यांच्याकडे टाकीत त्यांना त्या वस्त्राची किंमत विचारली. दादोसांनी चट्कन ती सोळा दाम सांगितली; कारण महदाइसांजवळ सोळा दाम होते हे दादोसांना ठाऊक होते. नंतर स्वामी आणि दादोस यांच्यात झालेला संवाद असा :

> ''सर्वज्ञे म्हणितले, 'सोलें दामें आणुनि देयाल : बाइ : देया सोळा दासः' 'जीः जीः पाऊणा आसु लाहे:' सर्वज्ञे म्हणितले, 'पाऊणा आसु आणुनि दयालः बाइः देया पाऊण आसूः' 'जीः जीः तरि एकि आसु लाहे' सर्वज्ञे म्हणितले तरि एकि आसु आणुनि दयालः बाइः दया एकि आसुः

याप्रमाणे दादोस वस्त्रांचा भाव वाढवीत होते. स्वामी त्यांचा उपहास करीत होते. येथे -

१६ दाम - पाळण आसु - एक आसु असा क्रम दिसतो

डॉ. शं. गो. तुळपुळे संपादित लीळाचरित्रात[२] हा क्रम

सोळा दाम - अठरा दाम - वीस दाम

असा येतो; तर ह. ना. नेने संपादित लीळाचरित्रात[३] हाच क्रम

सोळा दाम - अठरा दाम - वीस दाम

असा येतो. यातून आसु आणि दाम यांचे कोष्टक मांडता येईल. वीस दाम म्हणजे 'पाऊण आसू' म्हणता येणार नाही; कारण वीस या संख्येला तीनचा भाग जात नाही. वीस दाम म्हणजे एक आसू होणार नाही; कारण मग पाऊण आसु म्हणजे पंधरा दाम होतील आणि ते महदाइसांच्या गाठी असलेल्या मूळ रकमेपेक्षाही कमी होतील. तेव्हा वरील तिन्ही निर्देशांचा विचार करता

अठरा दाम = पाऊण आसु

हे कोष्टक नीट जुळते; आणि

२४ दाम = १ आसु

असे ठरविता येते. याचाच अर्थ सहा दाम म्हणजे पाव आसु असा होतो. पाव आसूचे पूर्वीच्या पावली (अथवा चौव्वल)प्रमाणे छोटे नाणे असावे. आणि त्यालाच 'छदाम' म्हणत असावेत. मी तुझे चार चौव्वल देणे लागत नाही असाही वाक्प्रचार आहेच.

**३. थामोके आणि चिंचोके**

स्वामी एकांक काळात वडनेर (वडनेर भुजंगाचे, तालुका आणि जिल्हा अमरावती) येथे असताना ते गोपाळांसह दुसी - ग्राहिक खेळले[४]. दुस म्हणजे छोटा तंबू. त्यात बसून विक्रय करणारा तो दुसी अथवा दोसी. स्वामींनी बाभळीच्या बियांचे दाम केले. आणि चिंचोक्याचे आसू. येथे बाभळीच्या बियांना 'दामोटे' असेच म्हटले आहे. तेव्हा दाम गोल आणि आसु चौकानी होते हे उघड दिसते. आजही मराठवाडा - विदर्भ भागात बाभळीच्या बियांना धामोके म्हणतात. ते दामपासूनच आले आहे.

**आक्षेप-परिहार**

या सर्व विवेचनावर एक आक्षेप असा की छदाम शब्द हिंदी भाषेतही आहे. दाम हे नाणे हिंदी प्रदेशात होते तसे आसु हे नाणे हिंदी भाषी प्रदेशात होते का? आसु नाणे हिंदी प्रदेशात प्रचलित होते याचा स्पष्ट पुरावा सापडतो. पंचराज देवाच्या तहंकपार (जिल्हा कांकेर, छत्तीसगढ) शिलालेखात[५] सराहगडाम आछु (सराहगड अथवा सारंगगढ येथील टाकतीळीतील आसु) असा निर्देश आहे. मध्यप्रदेश भागातील इतर

अनेक प्राचीन शिलालेखांत आसु नाण्याचे उल्लेख सापडतात.

नेवासे येथे ज्या खांबाला टेकून श्रीज्ञानेश्वर माऊलींनी ज्ञानेश्वरी सांगितली त्या खांबावर लेख आहे. त्यात कुणी आपल्या पितामहाने (वीरेश्वरदेवाच्या ?) अखंड दीपासाठी तेल मिळावे म्हणून 'षटकं दत्तं' असा निर्देश आहे. यात षटक म्हणजे छदाम असावे काय ?[६]

**संदर्भ :**


१. म्हाइंभट, लीळाचरित्र, सं० वि.भि. कोलते, तिसरी आवृत्ती, पूर्वार्ध लीळा क्र. ४००

२. लीळाचरित्र, सं० शं.गो. तुळपुळे, पूर्वार्ध, भाग पहिला, लीळा क्र. १९०

३. लीळाचरित्र, सं० ह.ना. नेने भाग तिसरा, पूर्वार्ध खंड दुसरे, लीळा क्र.१०.

४. वि. भि. कोलते, उपर्युक्त, पूर्वार्ध लीळा क्र. ७८.

५. V. V. Mirashi, Corpus Inscriptionum Indicarum, IV, part II, p.598

६. IA., IV., pp 353-355. ■



ऐतिहासिक, 14, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद 439 004.

95240 - 2336606


**परिषद-वार्ता**

## महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार

मराठी अभ्यास परिषदेतर्फे बँक ऑफ महाराष्ट्रच्या सहकार्याने देण्यात येणाऱ्या मराठीतील सर्वोत्कृष्ट 'महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कारा'साठी (२००८) **प्रा० यास्मिन शेख** यांच्या 'मराठी शब्दलेखनकोश' (मनोविकास प्रकाशन, पुणे) या पुस्तकाची निवड करण्यात आली आहे. परीक्षक-समितीत **डॉ० अंजली सोमण** (निमंत्रक), **डॉ० सरोजा भाटे** व **प्रा० आनंद काटीकर** यांचा समावेश होता.

पारितोषिक-वितरण समारंभ शुक्रवार, दि. १६ जानेवारी २००९ या दिवशी वेदशास्त्रोत्तेजक सभा, सदाशिव पेठ, पुणे ३० येथे सायंकाळी ५-३० वाजता होईल. या वेळी प्रमुख पाहुणे **डॉ० प्रमोद तलगेरी**, कुलगुरू, मल्टिव्हर्सिटी 'जागतिकीकरण आणि भाषांचा विकास' या विषयावर आपले विचार मांडतील.

# कन्नड भाषेला 'अभिजात भाषा' म्हणून मान्यता !

उमा वि. कुलकर्णी

३० ऑक्टोबर २००८ रोजी केंद्र सरकारच्या सांस्कृतिक खात्याने कन्नड आणि तेलुगु भाषांना 'अभिजात भाषा' म्हणून मान्यता दिली. १ नोव्हेंबर रोजी होणाऱ्या दोन्ही राज्यांच्या राज्योत्सवानिमित्त मिळालेली ती एक उत्तम भेट ठरली ! श्रीमती अंबिका सोनी यांनी या संदर्भात सांगितलं, 'तज्ज्ञांच्या शिफारसीनुसार या दोन्ही भाषांना 'क्लासिक' (अभिजात) भाषा म्हणून मान्यता देण्यात येत आहे.'

या आधी प्रथम तमीळ आणि त्यानंतर संस्कृत भाषेला हा मान मिळाला आहे. तसेच यानंतर आणखी कुठल्याही भाषेनं अशी मागणी न केल्याचेही श्रीमती सोनी यांनी सांगितले.

एखादी भाषा 'अभिजात' ठरवताना तिचं पुरातनत्व किमान हजार वर्षांपूर्वीपर्यंत सिद्ध करता आलं पाहिजे, असा आधी नियम होता. त्यात बदल करून आता हा कालावधी १५०० ते २००० वर्षांपर्यंत मागे नेण्याची मागणी तमिळनाडूनं करून ती मान्य करून घेण्यात यश मिळवलं आहे ! त्यामुळे कन्नड भाषेला आपलं 'अभिजात'त्व सिद्ध करताना या नव्या नियमांना तोंड द्यावं लागलं !

भाषेच्या पुरातनत्त्वाबरोबरच त्या भाषेतील प्रत्येक कालखंडात निर्माण झालेल्या अभिजात साहित्याचा परामर्शही घेतला जाणं गरजेचं आहे. शिवाय हे 'अभिजात' साहित्य स्वतंत्र आणि ते उच्च दर्जाचं असलं पाहिजे, अशीही त्यासाठी अट आहे.

वृत्तपत्रांमधून या संदर्भात काही माहिती मिळाली. कर्नाटकाचे माजी मंत्री आणि कन्नड लेखक एम.पी. प्रकाश यांचा एक सुदीर्घ लेख वाचनात आला. तरीही मनात काही प्रश्न होते. मैसूर येथील कन्नड भाषेचे सुप्रसिद्ध विद्वान प्रा० डॉ० टी.व्ही. वेंकटाचलशास्त्री यांच्याशी संपर्क साधून काही प्रश्नांची उत्तरं मिळवली आणि काही प्रमाणात हा विषय समजावून घेतला तो असा :

'अभिजात' या संज्ञेला कन्नड भाषा पुरेपूर पात्र आहे यात शंका नाही.

अशोक स्तंभावरील काही शब्दांच्या उल्लेखावरून इ.स.पू. काळापासून विद्वान कन्नड भाषेचं (बोली) अस्तित्व मानतात. चवथ्या शतकातला हल्मिडीचा शिलालेख

हे कन्नड भाषेतील पहिलं लिखित अक्षर. अलीकडे काही विद्वानांच्या मते याहूनही पूर्वीचे शिलालेख आढळले आहेत. कन्नडमधील पहिला लिखित ग्रंथ म्हणजे ९व्या शतकातला 'कविराज मार्ग.' या ग्रंथात त्या आधी लिहिलेल्या काही ग्रंथांचे उल्लेख आढळतात. त्यावरून लिखित ग्रंथांची परंपराही हे विद्वान ६ ते ७ या शतकापर्यंत नेतात.

या 'कविराजमार्ग'मध्ये कर्नाटकाच्या सीमा 'कावेरीपासून गोदावरीपर्यंत' असल्याचा उल्लेख आढळतो. येथील राजकर्त्यांनीही कन्नड भाषेचा अभिमान बाळगल्यामुळे संपूर्ण दक्षिण भारतात आणि महाराष्ट्राच्या तीन-चतुर्थांश भागात कन्नड शिलालेख आढळतात. ('महाराष्ट्रातील कन्नड कोरीवलेख' हे एम.एम. कुलकर्णी यांचे पुस्तक जिज्ञासूंनी पाहावे. प्रकाशक - पद्मगंधा प्रकाशन). तसेच दक्षिण भारतात सर्वप्रथम कन्नड भाषेनं लिपी मिळवली, असेही विद्वान मानतात.*

कन्नड साहित्याचा ९व्या शतकानंतरचा मात्र प्रवाह उपलब्ध आहे. सुरुवातीला जैन कवींनी कन्नड काव्यरचना केली. त्यांचा सामना राजाश्रय असलेल्या संस्कृत कवींशी असल्यामुळे त्यांनी आपल्या काव्यरचना पुरेशा गांभीर्यानं केल्या आहेत. त्यामुळे याच टप्प्यावर कन्नड भाषेला पुरेसं प्रौढत्व आलं.

१२व्या शतकात निर्माण झालेल्या वचन-साहित्यानं स्वतःची संस्कृतमधून पूर्णपणे सुटका करून घेतली. त्यांनी कन्नड भाषेचा उपयोग काव्यासाठी म्हणून करण्यापेक्षा सहज-अभिव्यक्तीचं साधन म्हणून केला. हा एक भाषा-विकासाच्या दृष्टीनं अत्यंत महत्त्वाचा टप्पा म्हणावा लागेल !

यानंतर हरिदासांनी (१४वं शतक) कन्नड भाषेचं आणखी पोषण केलं. कन्नड-संस्कृत यामध्ये श्रेष्ठ-कनिष्ठता वाढल्याचा हाच काळ असला तरी दासांनी कन्नड भाषेत गेयता आणली आणि कनकदास - पुरंदरदासांनी ती गेयता घरोघर पोहोचवली. हरिहर, राघवांक, कुमारव्यास, सर्वज्ञ यांनी या भाषेचा आपापल्या परीनं विस्तार केला.

विशेष म्हणजे ९व्या शतकापासून (किंवा त्या आधीपासून) अस्तित्वात असलेले 'चंपू', 'षट्पदी' यासारखे काव्य-प्रकार १७व्या शतकापर्यंत तितक्याच प्रभावीपणे अस्तित्वात होते. आजही कर्नाटकात 'महाकाव्या'ची परंपरा, तुरळक प्रमाणात का होईना, दिसून येते.

कन्नड आधुनिक साहित्याचा प्रवाह अरुणोदय (१९२०पर्यंत), नवोदय (१९२० ते ५०), प्रगतिशील (१९५० ते ६०), नव्य (१९६० ते ७०), नव्योत्तर आणि बंडाव (१९७० ते ९०) आणि त्यानंतरचा काल अशा मार्गानं वाटचाल करत आहे.

* तमीळ भाषेला ही लिपी ६व्या शतकात प्राप्त झाली असं म्हणतात.

या साहित्याने ७ ज्ञानपीठ पुरस्कार मिळवले असून अजून कितीतरी उत्तम लेखक या पुरस्कारापासून वंचित राहिले आहेत, अशी कन्नडिगांची भावना आहे.

कन्नड भाषेला 'अभिजात भाषा' म्हणून मान्यता मिळवण्याचा मार्गही फारसा सुकर झाला नाही. सर्वप्रथम, जाचक केले गेलेले नियम ! त्यानंतर जेव्हा 'ही मान्यता देण्यात यावी' अशा विचारापर्यंत तज्ज्ञ येऊन पोहोचले, तेव्हा तामिळनाडूमधील 'गांधी' असे टोपणनाव धारण केलेल्या एका व्यक्तीने यावर आक्षेप घेऊन या निर्णयावर स्थगिती आणावी म्हणून एक अर्ज चेन्नईच्या हायकोर्टाकडे दिला. या कारणासाठी ही मान्यता मिळायला आणखी विलंब लागला. अखेर केंद्र सरकारने ही स्थगिती रद्द करण्याबाबत चेन्नई हायकोर्टाकडे अर्ज दिला आणि कन्नड भाषेला 'अभिजात' भाषेचा दर्जा मिळवला.

तेलुगू भाषिकांनी फारशी धडपड न करता आपले राजकीय सामर्थ्य वापरले आणि हा दर्जा मिळवला, असे म्हटले जाते !

कन्नड भाषेला 'अभिजात' भाषेचा दर्जा मिळाला, याचे प्रत्यक्ष फायदे काही आहेत का, हा खरा प्रश्न ! तेव्हा समजलं, हीच त्यातली खरी गोम आहे !

केंद्र सरकारकडून या भाषेसाठी सुमारे १०० ते १०५ कोटी रुपयांचं अनुदान अपेक्षित आहे ! या प्रचंड पैशाच्या ओघाचा या भाषेच्या रक्षणासाठी, अध्ययनासाठी, अभिवृद्धीसाठी नीट वापर होणं ही यानंतरची फार मोठी जबाबदारी आहे.

या आर्थिक मदतीतून संशोधन, प्रकाशन, भाषांतरे, अध्यासन, योजना-प्रकल्प अशा अनेकानेक योजना राबवणं शक्य आहे. या विषयातील तरुण संशोधकांना पुरस्कार आणि शिष्यवृत्त्या-अभ्यासवृत्त्या देता येतील. या विषयांमध्ये विद्यार्थ्यांना रस निर्माण व्हावा म्हणून अनेक उपक्रम राबवता येतील. केंद्रीय विद्यापीठात कन्नड अध्यासन स्थापन करता येईल, थोडक्यात सांगायचं तर तरुणांच्या विद्वत्तेला आकर्षित करून घेण्यासाठी बरंच काही करता येणं शक्य आहे.

कन्नड भाषेला हे स्थान मिळाल्याचं जाहीर होताच कर्नाटक सरकारनं यासाठी पाठपुरावा करणाऱ्या शंभरजणांचा पुरस्कार देऊन सत्कार करण्याचा कार्यक्रम आयोजित केला; पण त्याला फार मोठ्या प्रमाणात विरोध झाल्याने तो रद्द झाला.

पाठपुरावा करणाऱ्यांचा सत्कार-कौतुक या गोष्टी आवश्यक असल्या तरी आता खरी निकड आहे ती या सर्व आर्थिक ओघाचं सुयोग्य नियंत्रण करणाऱ्या एखाद्या भक्कम समितीची रचना करण्याची ! शिवाय या संदर्भात अजूनही कितीतरी प्रश्न अनुत्तरित आहेत. हा पैसा कर्नाटकात कुठल्या मार्गानं पोहोचणार आहे ? साहित्य अकादमी ? कन्नड साहित्य अकादमी ? विद्यापीठे ? शिक्षणसंस्था ? याविषयी काहीच स्पष्टता नाही.

मैसूर येथील 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ लॅग्वेंजेस'च्या प्रा० लिंगदेव हळेमने यांनी सांगितलं आहे, ''आधी गरज आहे ती लगोलग भाषा-संशोधक आणि तज्ज्ञांची एक समिती स्थापन करण्याची ! उच्च प्रतीचं संशोधन आणि अध्ययन होण्यासाठी आवश्यक ते वातावरण आणि पार्श्वभूमी तयार करणं ही तातडीची गरज आहे.''

मैसूर येथील ज्येष्ठ भाषातज्ज्ञ डॉ० टी.व्ही. वेंकटाचलशास्त्री यांच्या मते, 'करायला भरपूर काम आहे ! शेकडोंच्या संख्येने जुनी-नवी उत्तम हस्तलिखिते उपलब्ध आहेत. संस्कृती, इतिहास, धार्मिक विषयावरील एवढे साहित्य उपलब्ध आहे, की किमान शंभर वर्षं संशोधक यावर काम करू शकतील. शिवाय लोकसाहित्याचा, लोककलांचा शास्त्रीय अंगानं अभ्यास करणं शक्य आहे ! या निमित्तानं कर्नाटककडे येणाऱ्या पैशाच्या ओघाचा सुनियोजित विनियोग केला तर कन्नड भाषेचे 'अभिजात'त्व आपण टिकवू शकू !'

हे सर्व मांडताना सगळे विचारवंत अखेरीस एका मुद्द्यावर येताना दिसतात. कन्नड भाषेला 'अभिजात' भाषा म्हणून मान्यता मिळाल्याचा आनंदोत्सव साजरा करताना भाषेकडे दुर्लक्ष होताना दिसतं. बेंगळुरूमध्ये कन्नड न येणारा माणूस वावरू शकतो. पण तमीळ न येणारा, नाही ! शिवाय पुढची पिढी इंग्लिश शाळांमध्ये शिक्षण घेतेय. त्यांचं 'कंग्लिश' (कन्नड + इंग्लिश) हा विनोदाचा आणि काळजीचा भाग आहे ! ■

1098/11-ब, 'पार्थ हेरिटेज', मॉडेल कॉलनी, पुणे 411 016. भ्रमणभाष : 94235 72550

# भाषिक व्यवहार :
# मानसशास्त्रीय विचार आणि व्याकरणाची मांडणी

उमाकांत रा. कामत

भाग १

मोरो केशव दामले यांनी मराठी व्याकरण-विचाराला 'शास्त्रीय' वळण दिले, असे सामान्यत: मानले जाते. त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाल्याला आता जवळपास शतक होत आले आहे. या काळात अनेक अभ्यासकांचे लेख वा व्याकरणग्रंथ प्रसिद्ध झाले असून, त्यातून मूळ 'शास्त्रीय' विचार पुढे नेण्याचाच प्रयत्न या अभ्यासकांनी केला आहे. या शास्त्रीय विचाराचे वैशिष्ट्य म्हणजे भाषेच्या व्याकरणविषयक विचारात वापरली गेलेली पृथक्करणात्मक पद्धती. या पद्धतीचे स्थूल स्वरूप दामल्यांनी ग्रंथाच्या उपोद्घातात (पृष्ठ ५) या शब्दांत मांडले आहे - ''...भाषेच्या दृष्टीने वाक्य हे तत्त्वत: महत्त्वाचे. त्याचे शास्त्रीय विवेचन समाधानकारक व पूर्णपणे म्हणजे यथासांग होण्यासाठी त्याचे अवयव जे शब्द आणि शब्दाचे अवयव जे वर्ण त्या सर्वांचे विवेचन व्याकरणास आवश्यक आहे.'' अशा रीतीने वाक्यातील घटकांच्या पृथक्करणानंतर 'विभक्ति विचारा'त या पद्धतीचे अधिक स्पष्टीकरण करताना दामले म्हणतात - 'शब्दविकारात वाक्याचा विचार येत नाही - म्हणजे 'वाक्यातील शब्दांचा परस्परसंबंध' हा विषय येऊ शकत नाही. इतकेच नव्हे, तर त्या विषयाच्या आकलनासाठी विकरण प्रकरणाची रचना व उभारणी करावयाची आहे, त्यात विभक्तिप्रत्यय व आख्यातप्रत्यय यांचे जे विवेचन करावयाचे ते नामांचा व क्रियापदांचा परस्परसंबंध कळावा म्हणून. तेव्हा त्या विवेचनात त्या विभक्तिप्रत्ययांनी दाखविले जाणारे संबंध म्हणजेच विभक्तांचे अर्थ गृहित धरून चालणार नाही... तसे करणे म्हणजे शास्त्रीय पद्धतीचे अज्ञान प्रकट करणे होय.''

या अभ्यासपद्धतीत वाक्य, शब्द आणि वर्ण हे परस्परांपासून अलग-पृथक् करून विचार करण्याचा दंडक घालून दिलेला आहे हे उघड आहे. यापैकी वर्णविचाराबद्दल मतभिन्नता नंतरच्या वैयाकरणांनी नोंदली असली तरी, रूपनिष्ठता - शब्दरूपांचा स्वतंत्र विचार - हेच व्याकरणाचे मुख्य तत्त्व म्हणून पारंपरिक व्याकरणात त्याचा स्वीकार झाला आहे. या परंपरेतील विद्यमान व्याकरणकार कृ. श्री. अर्जुनवाडकर आणि मा.ना. आचार्य यांनी शब्दरूपांतील प्रत्यय वेगळे काढून (विभक्त करून) प्रत्यय हेच व्याकरणिक अभ्यासाचे विषय आणि निर्णयाचे निकष मानले आहेत. अर्जुनवाडकरांनी

केलेले प्रत्ययांचे वर्गीकरण तंतोतंत ग्राह्य मानूनच आचार्यांनी 'मराठी व्याकरण विवेक' मांडला आहे. अर्जुनवाडकर म्हणतात (पृष्ठ ७८), ''भाषा म्हणजे शब्द आणि अर्थ. म्हणून व्याकरणाची प्रमाणं : रूप आणि अर्थ. रूप हे प्रथम प्रमाण; अर्थ हे दुय्यम प्रमाण.'' याचाच अनुवाद आचार्य करतात (पृष्ठ ११) : ''भाषा म्हणजे शब्द आणि अर्थ. तेव्हा अर्थाला सोडून भाषेचा विचार पूर्ण होणार नाही. परंतु शब्दाचे व्याकरणिक मूल्य अर्थावर अवलंबून नसते. म्हणून अर्थाची नोंद करण्याचे काम कोशकाराकडे सोपवून व्याकरण फक्त शब्दांच्या रूपांवर लक्ष केंद्रित करते.'' या दोघांच्या भूमिकेत 'शब्द' आणि 'अर्थ' यांचे अस्तित्व स्पष्टपणे 'अलग' मानले गेले आहे. म्हणजे दोहोंची फ़ारकत केली आहे. ही भूमिका मानवी भाषेच्या मूलभूत स्वरूपाशीच विसंगत आहे. कारण कोणताही एकगठित ध्वनिसमूह अर्थाचा वाहक/प्रतीक होतो, तेव्हाच तो त्या भाषेतील 'शब्द' बनतो. कोणत्याही मानवी भाषेतील 'शब्द' अर्थयुक्तच असतो. म्हणून 'शब्द आणि अर्थ' अशी वेगळी अस्तित्वे मानणारी शब्दयोजना 'शास्त्रीय' ठरणार नाही. ('शब्द' याचा 'ध्वनी' असाही अर्थ संस्कृत भाषेत होतो. पण व्याकरणात पारिभाषिक शब्दयोजना एका निश्चित अर्थानेच केली पाहिजे. पृथक्करण पद्धतीच्या आहारी गेल्यामुळे या अभ्यासकांकडून असा प्रमाद झाला असावा असे वाटते. 'अर्थाला सोडून भाषेचा विचार पूर्ण होणार नाही' असे नमूद करणारे आचार्य व्याकरण विवेकात कोठेही अर्थाचा आधार घेत नाहीत, हेही या संदर्भात लक्षणीय आहे. ''अर्थाच्या 'मृगजळामागं' व्याकरणकाराने धावू नये'', ही त्यांची भूमिका.

भाषेच्या व्यक्त रूपांचा अर्थाशी संबंध नाकारल्यावर आपण कोठे येऊन पोचतो, याचे उदाहरण म्हणून उपरोक्त दोघा माननीयांच्या ग्रंथातील अवतरणे दिली आहेत. यातील गमतीची गोष्ट अशी, की आपल्या 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद' या ग्रंथाला परिशिष्ट म्हणून जोडलेल्या टिपणात (पृष्ठ २००) अर्जुनवाडकर म्हणतात, ''वर्णसमूहाला अर्थतत्त्वाचा स्पर्श झाला की शब्दत्व येतं. अर्थ हा शब्दाचा प्राण होय, जिवंतपणा होय. शब्दाला प्राण कसा आला, याचं उत्तर 'आत्म्याला जीवपणा कसा आला' या प्रश्नाच्या उत्तरासारखंच कठीण आहे.'' (अधोरेखन माझे)

वस्तुत: शब्दाला अर्थरूप प्राणतत्त्व त्या त्या जनसमूहातील सततचा विशिष्ट अर्थपूर्ण वापरामुळे लाभते, त्यातून अर्थाचा सामाजिक संकेत तयार होतो, ही वस्तुस्थिती आता सर्वमान्य झाली आहे. हे अर्थतत्त्वच भाषेचा / शब्दांचा प्राण होय, हे संस्कृत भाषेतील प्रमाणग्रंथांच्या अभ्यासातून अजुर्नवाडकरांनी स्पष्टपणे नमूद केले आहे, ही बाब महत्त्वाची आहे. या प्राणभूत अर्थतत्त्वालाच यथायोग्य महत्त्व देऊन मराठी भाषेच्या व्याकरणाची पुनर्मांडणी करावी, असा विचार मी माझ्या (उन्हाळा २००६ अंकातील) लेखात मांडला आहे.

**भाषिक व्यवहाराचे स्वरूप**

भाषेचा सर्व व्यवहार अर्थाधिष्ठितच असतो आणि तो द्विविध असतो. समाजात दीर्घकाळ रूढ झालेल्या अर्थमुक्त ध्वनिसंकेतांच्या व्यवस्थेचा उपयोग कुटुंबातील दैनंदिन जीवनक्रमापासून (शिक्षण, व्यापार, वाहतूक, संरक्षण, टपाल, वृत्तपत्रे, प्रसारमाध्यमे, शासन, न्यायालय इ० इ०) अनेक सामाजिक संस्थांच्या कामापर्यंत सर्व सामाजिक व्यवहारांच्या पसाऱ्यात नित्यश: होत असतो. त्याचे स्वरूप दोन वा अधिक माणसांमध्ये चालणाऱ्या मानसिक आशयाच्या देवाणघेवाणीचे असते. त्याच वेळी त्यात सहभागी होणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या मनात (त्या त्या अनुभवांचे आकलन, स्मृतिमरूप जतन, त्यावर विचार, तपासणी, पुनर्मांडणी, पूर्वयोजना, नवसंशोधन इ०) अनेक आंतरिक क्रिया भाषेतील ध्वनिसंकेतांच्या आधारेच चालू होतात. त्याद्वारे माणसे नवनवा अर्थ, नवा विचार, नव्या इच्छा, गरजा इ० आत्मसात करीत असतात. यातून प्रत्येकाची वेगवेगळ्या प्रकारची 'आंतरिक वाढ व घडणही' होत जाते. अशा प्रकारे सामाजिक देवाणघेवाण आणि व्यक्तींची आंतरिक घडण या दोन्ही क्रियांमध्ये भाषेतील शब्दांशी निगडित मानसिक आशय, अनुभव वा अर्थ हाच समान घटक काम करीत असतो. या अर्थाने सर्व भाषा 'अर्थवादी'च असतात. भाषांच्या लिखित/मुद्रित रूपात हा 'अर्थच' साठवून जतन केला जातो, पुढील पिढ्यांकडे पोचविला जातो. म्हणजे अर्थ हेच भाषेचे साररूप, प्राणतत्त्व - 'एकं सत्' असते. भाषेच्या कोणत्याही पैलूच्या अभ्यासकाला त्यामुळेच ते उपेक्षिता येणार नाही. अर्थतत्त्व दुर्लक्षून भाषेचे व्यवस्थापन सूत्र मांडता येणार नाही.

**मराठी व्याकरण विचार**

मराठीसारख्या भाषेतील शब्दांची विविध रूपे केवळ निर्जीव प्रत्ययांमुळे निर्माण होत नाहीत. मूळ शब्दांना प्रत्यय खिळे ठोकून बसवायच्या तुकड्यांसारखे जोडले जातात, ही काही अभ्यासकांनी मांडलेली यांत्रिक संकल्पना भाषेच्या विकसनशील स्वरूपाशी पूर्णतया विसंगत आहे. वस्तुत: दोन वा अधिक शब्दांतून अर्थपूर्ण वाक्य तयार करताना, ती भाषा बोलणाऱ्याच्या मनात ती शब्दरूपे तयार होतात. बोलणारी व्यक्तीच त्या शब्दरूपांची 'जनक' असते. विशिष्ट मानसिक आशय अभिव्यक्तीसाठी वाक्यात संघटित करताना, विशिष्ट शब्दरूपांच्या गुंफणीतून ती व्यक्ती पूर्णार्थाची बांधणी करते. म्हणजे एकेक शब्दरूप बोलणाऱ्या व्यक्तीच्या मनातून फुलासारखे उमलून येते. भाषेमागे उभे असलेले मानवी मेंदूतील अब्जावधी मज्जापेशींचे सामर्थ्य त्या 'उमलण्याच्या' - विकसित होण्याच्या क्रियेमागे उभे असते. त्यामुळे मराठी भाषेच्या कोणत्याही प्रादेशिक बोलींमधील एकाच शब्दाची समानार्थक रूपे वेगवेगळी होतात. उदा० मराठीत पाखराला, पाखराक, पाखरास्नी, पाखराले, पाखराइले, पाखराह्ले,

पाखरागेले, पाखरान्हे इ० विविध बोलींतील समानार्थक रूपे अशा भिन्न मानवी प्रयत्नांतून विकसित झाली आहेत. तरीही पारंपरिक व्याकरणकार प्रमाणभाषेतील विशिष्ट प्रत्ययांवर बोट ठेवून एखादी विभक्तीच रद्द करतात ही विसंगती नव्हे काय ? भाषेतील शब्दविकाराबद्दलच्या साचेबंद कल्पनाच वास्तवाशी होणाऱ्या या विसंगतीला कारणीभूत होत आहेत. भाषा ही मानवी प्रयत्नांतून निर्माण होते. ती मानवाची सर्वश्रेष्ठ निर्मिती आहे. ती चैतन्यशील, विकसनशील व विलक्षण लवचीक आहे, म्हणूनच माणूस तिच्या साहाय्याने सर्व प्रकारची 'नवनिर्मिती' करू शकतो. नवे आकार निर्माण करू शकतो. वस्तूंचे, कल्पनांचे, विचारांचे, प्रमेयांचे वा सिद्धांताचे मोठमोठे मनोरे उभारू शकतो. भाषेच्या द्वारे प्रचंड प्रकल्प उभे करून अवकाशातही संचार करू शकतो. हे मानवी मेंदूत दडलेल्या अजब सामर्थ्यामुळेच शक्य होते. त्या सामर्थ्याच्या शास्त्रीय स्वरूपाचा परिचय करून घेण्याआधी, व्याकरणिक परिभाषेतील 'क्रियापद' या संज्ञेच्या व्यापक अर्थाचा थोडा उलगडा करून घेऊ.

वाक्यातील 'क्रियापद' हा सर्वांत महत्त्वाचा शब्द. तो विशिष्ट 'क्रिया'वाचक असतो, वाक्यार्थ पूर्ण करतो, तसेच क्रियेचा काळ, अर्थ आणि स्थिती याही छटा व्यक्त करतो. त्याबरोबरच पुरुष, वचन आणि (मराठीत) लिंग हेही 'विकार' त्याला होतात. या अनेक गुणधर्मांमुळे तोच वाक्यातला सर्वात 'चैतन्यशाली' शब्द ठरतो, हे उघड आहे. मूळ धातूचे क्रियापदरूप तयार होताना होणारा, 'पुरुष' हा विकार 'सर्वनामसंबद्ध' आहे, असे आचार्य म्हणतात (पृष्ठ ४२). ही 'पुरुष' संकल्पना सर्व भाषांत असल्यामुळे, तिचा अधिक खोलवर विचार केल्यास वेगळाच अर्थ ध्यानी येतो. पुरुष म्हणजे माणूस, मानवी व्यक्ती. प्रथम पुरुष म्हणजे (भाषा) बोलणारा माणूस. भाषाप्रक्रियेत तो पहिला असतो. तो कोणीही असला तरी स्वत:बद्दल 'मी' हा एकच शब्द (मराठी भाषेत) वापरतो - त्याबद्दल नाम वापरीत नाही. द्वितीय पुरुष - म्हणजे दुसरा माणूस - ही ऐकणारी व्यक्ती - त्याबद्दल 'तू' हा एकच शब्द बोलणारा माणूस वापरतो - त्याबद्दलही नाम येत नाही. बोलणारे व ऐकणारे अनेक असतील तेव्हाही 'आम्ही' व 'तुम्ही' ही सर्वनामेच येतात. बोलणारा(रे) व ऐकणारा(रे) यांखेरीज कोणीही (एक वा अनेक) हा तिसरा किंवा तिसरेच असतात (तृतीय पुरुष) त्यांचा उल्लेख मात्र नामांनी किंवा सर्वनामांनी होतो. (नामे फक्त तृतीय पुरुषातच येतात)

भाषेतील ही पुरुषवाचक चौकट समग्र भाषा व्यवहाराची पायाभूत संकल्पना आहे. तिच्या आरंभस्थानी (कोणतीही) भाषा बोलणारा पहिला माणूस आहे - हा बोलणारा माणूसच 'वाक्य' (म्हणजे सांगण्यास योग्य - सांगावयाचे असेल ते काही) बोलतो. वाक्याची गुंफण तोच करतो. वाक्यातून सलग अर्थ सांगण्यासाठी शब्दांची विशिष्ट रूपे तोच तयार करतो - म्हणूनच तो क्रियारूपाशी - व्याकरणात नित्य निगडित

असतो. व्याकरणिक परिभाषेचा असा उलगडा करतानाच, व्याकरणिक अभ्यासाची स्पष्ट दिशा आपल्याला सापडते, ती भाषा बोलणाऱ्या माणसाच्या भूमिकेतून अभ्यास करण्याची - त्या परिप्रेक्ष्यातून विचार व निर्णय करण्याची. वाक्यातील शब्दरूपे माणूस घडवतो, वापरतो आणि बदलतोही - शब्दरूपे तो बदलू शकतो म्हणून वाक्यरचना बदलते. त्यांची नवी मांडणी तो करू शकतो, म्हणूनच भाषेद्वारे नवविचार वा संशोधन होऊ शकते. कथा, कविता, नाटक, कादंबरी इ० विविध वाङ्मयप्रकार निर्माण होतात. त्यात आत्मकथन, पात्रमुखी-कथन, त्रयस्थ-निवेदन, व्यापक तत्त्वज्ञान, शास्त्रीय सिद्धांत काहीही येऊ शकते. केवळ व्याकरणिक प्रत्ययांच्या बंदिस्त चौकटीत भाषाभ्यास अडकून पडला, तर नवनिर्मितीची ही वाट सापडणार नाही. अर्थांची - अर्थयुक्त शब्दांची नवनवी जुळणी, गुंफण वा संघटना हीच नवनिर्मितीकडे घेऊन जाणारी वाट असते. या नव्या जुळणीमागे घडणाऱ्या मानवी मेंदूमधील क्रियांचे स्वरूप आता त्यासाठी थोडक्यात समजून घेऊ.

**शरीर-मानसशास्त्रीय विचार**

भाषिक विकासाच्या आरंभी माणसे भाषेतील शब्दांचे अर्थ शब्दकोशातून समजून घेत नाहीत. त्यातील किमान प्राथमिक शब्दसंपत्ती प्रत्येकाच्या मनात त्याने घातलेल्या प्रत्यक्ष अनुभवांतून 'अर्थपूर्ण' होते. उदा० चिमणीचा आकार, तिचा रंग, तिचे पंख, तिचे उडणे, तिचा चिवचिव आवाज इ० गुणधर्म लहान मुलाच्या मनात प्रत्यक्ष अनुभवांतून हळूहळू 'एकत्र' येऊन 'चिऊ' वा 'चिमणी' या (आईवडिलांनी ऐकविलेल्या) शब्दाबरोबर साठविले जातात. या क्रियेतील लक्षात घेण्याजोगा शास्त्रीय तपशील असा : अनुभव घेणाऱ्या प्रत्येक मानवी ज्ञानेंद्रियाची रचना व कार्य यांचे उत्क्रांतिप्रक्रियेतून विशेषीकरण (स्पेशलायझेशन) झालेले आहे. म्हणजे उदा० डोळ्यातील ग्राहक मज्जातंतू फक्त दृक्संवेदना/प्रकाशसंवेदनाच ग्रहण करू शकतात; ध्वनी, गंध, वा रुची समजू शकत नाहीत-परिणामत: एका ज्ञानेंद्रियामागील ग्राहक मज्जातंतू दुसऱ्या इंद्रियाच्या मज्जातंतूचे कार्य कधीच करू शकत नाहीत. त्यामुळे एखाद्या वस्तूचे सर्व गुणधर्म समजून घेण्यासाठी विविध ज्ञानेंद्रियांकडून आलेल्या संवेदनांचे मेंदूपृष्ठातील उच्चस्तरीय केंद्रांत 'एकत्रीकरण व संघटन' व्हावे लागते. उदा० साधा 'आंबा' या शब्दाचा नीट अर्थ कळण्यासाठी त्याचा आकार, रंग, वास, चव, वजन, (पिकलेल्या आंब्याचा) स्पर्श - टणकपणा/मऊपणा इ० भिन्न संवेदने मेंदूकेंद्रात 'संघटित' व्हावी लागतात. त्यांची स्मृति-क्षेत्रात यथायोग्य 'जुळणी-मांडणी' व्हावी लागते - त्यातून 'आंबा' या शब्दाच्या यथायोग्य अर्थाचे 'आकलन' होते व स्मृतिक्षेत्रात साठवण-जतनही होते. अनुभवांच्या 'संघटित' मांडणीला संबोध किंवा संकल्पना म्हणतात. भाषेतील प्रत्येक जातीच्या शब्दामागे अनुभवांच्या भिन्न भिन्न प्रकारांतून

निर्माण झालेले 'संबोध' असतात. [उदा० पोपट, झाड, तळे, मासा, इ० नामे, लाल-हिरवा, मऊ-टणक, लहान-मोठा, शहाणा-वेडा इ० विशेषणे; हळू-भरभर, उंच-खाली, येथे-तेथे इ० क्रियाविशेषणे; हसणे-धावणे-उडणे-पोहणे इ० क्रिया] विविध जातींच्या शब्दांमागे प्रत्येकाच्या मनात अशा प्रकारे अनुभवांतून तयार झालेल्या 'संकल्पना' वा संबोधच असतात.

बोलणाऱ्याच्या मनात एखादे वाक्य तयार होताना नुसते शब्द (उदा० सकाळ, चंदू, झाड, चिंच, चढणे, चटकन) - एकत्र येऊन भागत नाही; सर्व शब्दांतून एक पूर्ण अर्थ व्यक्त होण्यासाठी - संघटित होण्यासाठी या (अर्थयुक्त) शब्दांचे यथायोग्य अर्थसंबंध व्यक्त करणारी रूपे विशिष्ट क्रमाने एकत्र गुंफावी लागतात. उदा० (या) चिंचेच्या झाडावर (आज) सकाळी (शेजारचा) चंदू चटकन चढला - यापेक्षा वेगळा आशय व्यक्त करताना. शब्दरूपे वेगळी होतात. झाडाच्या चिंचा चंदूने चटकन पाडल्या-यावरून निष्कर्ष असा निघतो की, भाषा बोलणारी व्यक्ती आपल्या मनातल्या आशयानुसार (अर्थ संबोधयुक्त) शब्दांची वेगवेगळी रूपे तयार करून, शब्दांमधले विशिष्ट अर्थसंबंध जुळवून आणून, त्यांचे पूर्णार्थ व्यक्त करणारे वाक्य तयार करते. या क्रियेत शब्दांची 'अर्थयुक्त संघटना' तयार करण्यासाठी - त्यात 'अर्थयुक्त परस्पर संबंध' निर्माण करण्यासाठीच - बोलणारी व्यक्ती मूळ शब्दांची वेगळी रूपे योजते.

भाषाव्यवस्था ही माणसाची एक श्रेष्ठ निर्मिती आहे. ते मानवप्राण्याचे मानव असण्यामुळे होणारे वर्तन आहे, असेही म्हणता येईल. त्यामुळे मानवी वर्तनाचे सर्व व्यवच्छेदक गुणधर्म भाषाव्यवस्थेत अपरिहार्यपणे आढळतात. त्यापैकी महत्त्वाचा म्हणजे 'हेतुपूर्णता' मानवेतर प्राणी अनेक गोष्टी केवळ निसर्गधर्मातून - सहज प्रवृत्तीतून एका ठरावीक तऱ्हेने करतात. मानव मात्र आपल्या वर्तनाला-कृतीला-निर्मितीला हेतुपूर्वक नवनवे वळण वा रूप देऊ शकतो. भाषेतील शब्दांना वेगवेगळी रूपे - विभक्तिरूपे आणि आख्यातरूपेही बोलणाऱ्या माणसाच्या हेतुपूर्वक प्रयत्नांतूनच प्राप्त होतात. निसर्गदत्त ध्वनियंत्रणा पृथ्वीच्या पाठीवरील भिन्न भिन्न प्रदेशांत भिन्न जनसमूहांनी वेगवेगळ्या रीतींनी वापरली, त्यातून वेगवेगळी ध्वनिरूपे गठित झाली, म्हणूनच जगात अनेक भाषा निर्माण झाल्या. तसेच एका भाषेच्या भिन्न बोलींतील समानार्थक रूपेही वेगळी झाली. (एकच बोली बोलणाऱ्या दोन व्यक्तींच्या उच्चारणातही थोडा फार फरक आपल्याला आढळतो.) इत्यर्थ असा की, भाषेतील शब्दरूपांचा अभ्यास करताना केवळ प्रत्ययांचा विचार करणे वा त्यांच्याच आधारे निर्णय देणे चुकीचे ठरेल. ती शब्दरूपे कोणता अर्थ व्यक्त करण्याच्या प्रयत्नांतून निर्माण झाली आहेत, याचाही विचार व्याकरणकाराने केला पाहिजे. शब्दांची भिन्न रूपे भिन्न अर्थसिद्धीसाठीच केली जातात, हे व्यापक सत्य त्याने लक्षात ठेवले पाहिजे. मराठी भाषेत कोणत्या अर्थाने

कोणती नामादिकांची वा धातूंची रूपे वापरण्याचे रूढ संकेत आहेत, याचे विवरण-विवेचन मराठी व्याकरणकाराने करावयाचे आहे. भाषेची घडण म्हणजे संकेतव्यूह त्यातूनच स्पष्ट होईल. ते व्याकरण 'मानवी' होईल, मानव्यशास्त्र बनेल.

भाषा कोणत्याही मानवसमूहाच्या सामाजिक व्यवहारांचे महत्त्वाचे साधन म्हणून उपयोगात आणली जाते, तशीच ती प्रत्येक व्यक्तीच्या आंतरिक मनोव्यापारांचे माध्यम म्हणूनही कार्य करीत असते, हे आपण पाहिलेच आहे. त्यामुळे ती माणसांचे अंतर्बाह्य जीवन व्यापून टाकते. भाषिक व्यवहार हे खास माणसाचे उच्चतर वर्तन आहे, हेही आपण लक्षात घेतले आहे. या अर्थाने ते मानसशास्त्रीय अभ्यासाच्या कक्षेत येते. मानसशास्त्र आज माणसाच्या संपूर्ण (अंतर्बाह्य) वर्तनाचेच शास्त्र बनले आहे. त्या अर्थाने ते सर्वजीवनस्पर्शी व सर्वव्यवहारव्यापक झाले आहे. त्यामुळे भाषेबद्दलचा कोणताही शास्त्रीय विचार करताना आजच्या काळात मानसशास्त्रीय विवेचन व संशोधनाचाही आधार अपरिहार्यपणे घेतला पाहिजे. मानसशास्त्राच्या आधुनिक संशोधनानुसार प्रत्येक मानवी व्यक्तीचे समाजातील इतरांशी होणारे व्यवहार आणि आंतरिक मनोव्यापार या दोन्हींच्या नियंत्रणाचे अधिष्ठान मानवी मेंदूत - म्हणजे एकूण केंद्रीय व स्वायत्त मज्जायंत्रणेत, तसेच शरीरांतर्गत विविध संस्थांच्या क्रियाप्रतिक्रियांतही आहे. (उदा० भावनात्मक वर्तन व भाषाव्यवहारात अंतस्राव ग्रंथींचा कार्यभाग असतो.) त्यामुळे उद्योगव्यापार, स्त्रीजीवन, बालविकास, शिक्षण, गुन्हेगारी वर्तन, आजार इ० मानवी जीवनाच्या विविध पैलूंचा विचार करणाऱ्या मानसशास्त्राच्या शाखा आज उदयाला आल्या आहेत. त्याचप्रमाणे भाषेबद्दलचा विचार करणारी मनोभाषा-विज्ञान ही शाखाही निर्माण झाली आहे. मानसशास्त्राच्या या सर्व विस्तारात 'शारीर मना'ची एक व्यापक संकल्पना पुढे आली आहे. मानवाचे बाह्य वर्तन आणि आंतरिक मनोव्यापार वा क्रियाप्रतिक्रिया या सर्वांमध्ये संपूर्ण शरीरांतर्गत संस्था 'संघटितपणे व एकजिनसीपणाने' काम करीत असतात, असा संशोधकांचा निष्कर्ष आहे. या संघटितपणात जेव्हा कोणतीही त्रुटी वा बिघाड निर्माण होतो, तेव्हा प्रमाद, गफलत, आजार, विकृती असमतोल इ० दोष निर्माण होतात. मानवी वर्तनाचे आणि समग्र जीवनाचे हे संघटन-तत्त्वच भाषिक व्यवहाराचेही पायाभूत तत्त्व आहे. त्याचे नियंत्रण केंद्रीय मज्जासंस्थेकडून होते. या संघटनप्रक्रियेत त्रुटी उद्भवल्यास बोलणाऱ्याच्या भाषेत त्या उतरतात.

उत्क्रांतिप्रक्रियेतून इतर प्राण्यांपेक्षा उच्चतर शरीरयंत्रणा, अनुकूल मुखरचना आणि लवचीक ध्वनितंतू असलेली ध्वनिमंजूषा मानवाला लाभली आहे. त्यामुळे माणसाची उच्चारणक्षमता अधिक परिवर्तनक्षम बनली असून तिचा आवाका (रेंज) फार मोठा आहे. त्यामुळे असंख्य प्रकारचे, लहानमोठे, उच्चनीच पट्टीतले ध्वनी माणूस मुखावाटे

काढू शकतो. निसर्गातल्या व प्राणिसृष्टीतल्या आवाजांचे अनुकरणही करू शकतो. या विविध ध्वनींच्या व ध्वनिसमूहांच्या उच्चारणाचे आणि अर्थवहनासाठी त्यांचा प्रतीकात्मक उपयोग करण्याचे - अशा दोन्ही प्रकारचे विकसित सामर्थ्य मेंदूच्या डाव्या गोलार्धात अधिकतर आहे. मानवी भाषेचा उगम आणि विकास यांची केंद्रे तेथेच आहेत.

भाषिक व्यवहार दुसऱ्याचे बोलणे ऐकणे व त्याला प्रत्युत्तर देणे या रीतीने चालतो. ऐकण्यासाठी दोन कान आहेत; पण बोलण्यासाठी मुखयंत्रणा एकच आहे. दोन कानांची श्रुतिवेदनकेंद्रे दोन गोलार्धांत असली तरी भाषिक प्रतीकांचे आकलन व उत्तर म्हणून अर्थयुक्त ध्वनिरूप उच्चारण यांची प्रमुख केंद्रे मेंदूच्या डाव्या गोलार्धातच आहेत. डाव्या गोलार्धातील अग्रखंडाच्या खालच्या भागालगत असलेल्या भेगेजवळच्या पृष्ठथरातील एक क्षेत्र भाषेच्या कार्यात सहभागी असल्याचा शोध पॉल ब्रोका या फ्रेंच शरीर-वैज्ञानिकाने लावला (१८६०-७०). त्यानंतर पुढल्या दशकात जर्मन मज्जातज्ज्ञ कार्ल वेर्निक याने कुंभखंडातील वरच्या भागातले क्षेत्रही भाषिक कार्यात सहभागी असल्याचे शोधून काढले. (या दोन्ही क्षेत्रांना त्या त्या संशोधक शास्त्रज्ञांची नावे देण्यात आली आहेत) नंतरच्या काळात या दोन्ही क्षेत्रांवर झालेल्या संशोधनाचा निष्कर्ष भाषाभ्यासकाच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. वेर्निकचे क्षेत्र श्रुतिकेंद्र व दृष्टिकेंद्र यांच्यामध्ये आहे. त्यामुळे ऐकलेली बोलीभाषा व डोळ्यांनी वाचलेली लिखित भाषा यांचे 'आकलन' याच क्षेत्रात होते. त्यासाठी स्मृतिक्षेत्रात जतन केलेली विशिष्ट ध्वनि-अर्थ साहचर्याची मदत या क्षेत्राला होते (म्हणजे या क्षेत्रातही वेगवेगळ्या मज्जाकेंद्रातून येणाऱ्या मज्जाप्रवाहांचा (नर्व्ह इंपल्सेज) परस्पर मेळ (कोऑर्डिनेशन) व संघटन (ऑर्गनायझेशन) होते. या केंद्रात झालेल्या आकलनानुसार उत्तर देण्याच्या भाषिक आविष्काराचा आशय व त्याला अनुरूप भाषिक वाक्यरचनेचा (संघटनेचा) ढाचा वेर्निक क्षेत्रातच तयार होतो. म्हणजे भाषा बोलण्याचा/लिहिण्याचा आकृतिबंध (पॅटर्न) याच क्षेत्रात घडतो. वर्निक व ब्रोका क्षेत्रांना जोडणारा अनेक मज्जातंतूंचा कमानदार आकाराचा एक जुडगा दोहोंमध्ये आहे. त्यातून एक व्यामिश्र मज्जाप्रवाहात्मक संदेश ब्रोका क्षेत्राकडे जातो. त्या क्षेत्रात मुखयंत्रणेतील सर्व स्नायूंवर नियंत्रण ठेवणारी कारक मज्जाकेंद्रे आहेत. तेथे ध्वनिमंजूषा, मुखपोकळी, जीभ, ओठ इ०च्या हालचालींची क्रमबद्ध व संघटित योजना होऊन वाक्यरूप उच्चारण होते. या क्रियेत मेंदूतील अब्जावधी पेशींपैकी निवडक व सुनिश्चित पेशीकेंद्रांची यथायोग्य जोडणी-जुळणी होण्यावर उच्चारित भाषेतील शब्दरूपांची अचूकता अवलंबून असते, हे ध्यानात घेतले पाहिजे. मेंदूतील प्रत्येक मज्जापेशीची अनेक शिखातंतू व शेपट्यांमुळे वेगवेगळ्या पेशींशी वेगवेगळ्या मार्गे जुळणी होऊ शकते. त्या वेळी प्रत्येक नस-संधीच्या ठिकाणी काही रासायनिक द्रव्यांची आंतरक्रिया होते व त्यातून विद्युत्-रासायनिक स्वरूपात ऊर्जाप्रवाह

एका पेशीकेंद्राकडून दुसऱ्या पेशीकेंद्राकडे जातो. (त्यातील रासायनिक द्रव्येही आज शोधून काढण्यात आली आहेत.) भाषिक अभ्यासकाच्या दृष्टीने विशेष लक्षात घेण्याजोगी बाब अशी की, या ऊर्जाप्रवाहांचे संमिश्ररूप व मार्ग यांचे यथोचित 'संघटन' होऊनच प्रत्येक वाक्यातील विशिष्ट शब्दरूपे (प्रत्यय नव्हेत) एकत्रित आणली जातात. हे 'संघटन'कार्यच नवीन वेगळी रचना निर्मिती करू शकते आणि तिचा गाभा आशय/अर्थसंघटनेचाच असतो.

**व्याकरणाच्या मांडणीची नवी दिशा**

भाषाविषयक आधुनिक संशोधनाने भाषिक व्यवहाराचे शास्त्रीय स्वरूप अशा प्रकारे उलगडून दाखविल्यानंतर व्याकरणकारांनी पारंपरिक दृष्टिकोण बदलून अभ्यासाची नवी दिशा स्वीकारली पाहिजे, हे स्पष्ट आहे. या नव्या विवेचनात मानसशास्त्र, शरीरविज्ञान, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र ही सर्व शास्त्रे एकत्र आली आहेत. कोणत्याही वस्तुस्थितीला अनेक पैलू असतात. त्यामुळे ज्ञान नेहमीच बहुआयामी असते, याची जाणीव सखोल अभ्यासातून सहजपणे होते. शास्त्रांचे वेगवेगळे कप्पे माणसांनी केवळ सोयीसाठी निर्माण केले आहेत. अलग शास्त्रांच्या या मर्यादा ध्यानात आल्यावर आज अनेक आंतरज्ञानशाखीय शास्त्रे अभ्यासविषय म्हणून मान्य झाले आहेत. जैवरसायन, जैवभौतिकी, कृषिअर्थशास्त्र, प्रजनन-अभियांत्रिकी इ० अनेक विषय अभ्यासक्रमात दाखल झाले आहेतच (त्यामुळे व्याकरणकाराने केवळ रूपविचाराचा हट्ट धरणे अप्रशस्त होईल) मानवी मेंदू सर्व ज्ञानाचे 'एकीकरण' करीत असतो. मेंदूतील अब्जावधी पेशींच्या परस्पर-जोडणी-जुळणीच्या शक्यतांची गणिती संख्या संपूर्ण विश्वातील अणुसंख्येइतकी होऊ शकेल, असे एका शास्त्रज्ञाने गमतीने म्हटले आहे. यावरून ज्ञानाचा व त्यानुसार भाषिक व्यवहारांचा संघटनात्मक पाया निसर्गाने केवढा विस्तृत निर्माण केला आहे, हे लक्षात येईल. मानवी जीवाच्या निर्मितीतही गुणसूत्रे, जनुके, डीएन्ए, आयूएन्ए इ०मधील घटकांच्या वेगवेगळ्या जुळणी-जोडणींतूनच अफाट व्यक्तिभिन्नता जन्माला येत असते. तशीच क्रिया सर्व जीवसृष्टीच्या निर्मितीतही होते. ती फार व्यामिश्र असते.

जीवसृष्टीतील या व्यामिश्र क्रियांचे प्रचंड विस्तृत स्वरूप लक्षात घेऊनच गेल्या शतकात उदयाला आलेल्या तत्काळ प्रत्ययवादी (गेस्टॉल्ट) पंथाच्या शास्त्रज्ञांनी मांडलेला विचार महत्त्वाचा मानला जातो. मॅक्सवर्दायमेर, कुर्त कॉफ्का आणि वुटफगाँग कोहलर यांनी मानवी 'आकलन' या मूलभूत क्रियेवर प्राण्यांच्या तुलनेने विस्तृत संशोधन करून असा सिद्धान्त मांडला की, जीवसृष्टीशी संबंधित कोणत्याही शास्त्राच्या अभ्यासात केवळ पृथक्करणात्मक पद्धतीतून सत्य हाती येत नाही. घटकांच्या बेरजेतून संपूर्ण घटिताचे स्वरूप वा गुणधर्म अनुमानिता येत नाहीत. घटकांच्या आंतरिक परस्परसंबंधांसह 'संपूर्ण' घटिताच्या स्वरूप-कार्याचा विचार फार प्रयत्नपूर्वक करावा

लागतो. मानवी भाषेच्या निर्मितीमागे मानवी शरीरातील सर्वोच्च संस्थेचे सामर्थ्य उभे असल्यामुळे तिच्या अभ्यासासाठी ही 'संघटनात्मक' दृष्टीच उपयुक्त ठरेल, हे स्पष्ट अनुमान यातून निघते.

**भाग २**

**प्रा० मिलिंद मालशे यांच्या प्रतिपादनाचा परामर्श**

'उन्हाळा २००६' या अंकातील माझ्या मूळ लेखावर अभ्यासपूर्ण प्रतिक्रिया व्यक्त करणारा ''व्याकरण आणि अर्थ : आधुनिक भाषावैज्ञानिक दृष्टिकोण'' हा प्रा० मिलिंद मालशे यांचा विस्तृत लेख हिवाळा २००७ या अंकामध्ये प्रसिद्ध झाला आहे. त्यातील काही निवडक विधानांचा परामर्श भाग १ मधील माझ्या विवेचनाच्या पार्श्वभूमीवर आता घ्यावयाचा आहे. प्रा० मालशे यांची विधाने व त्यावरचे माझे स्पष्टीकरण क्रमशः थोडक्यात नमूद करीत आहे. (विधानासमोर कंसात दिलेला पृष्ठांक त्यांच्या उपरोक्त लेखातील पृष्ठांकाचा निदर्शक आहे.)

(१) ''भाषा ही एक चिन्हव्यवस्था असते. तिचे स्वरूप मूलतः रचनात्मक, रचनाधिष्ठित असते. हे रचनाधिष्ठित स्वरूप जैविक पातळीवर निर्धारित झालेले असते.'' (पृष्ठ १५)

(२) ''अर्थ हा मूलभूत मानणारी भूमिका शास्त्रीय दृष्टीने विचार करता टिकणारी नाही.'' (पृष्ठ १८)

(३) ''अर्थ हा सुद्धा भाषेत रचनेच्या पातळीवर वावरतो, आशयाच्या नव्हे.'' (पृष्ठ १७-१८)

यांपैकी पहिल्या विधानात म्हटल्याप्रमाणे भाषा चिन्हव्यवस्था निश्चितच असते; पण कोणत्याही चिन्हमीमांसेत, वापरलेले प्रत्येक चिन्ह (सिग्निफायर) हे कशाबद्दल वापरले आहे, ते कोणता अर्थ चिन्हीत (सिग्निफाय) करते, याचा विचार व अभ्यास मीमांसकाला करावा लागतो. भाषेतील प्रत्येक शब्द - एकगठित ध्वनिरूप - एकेका प्रकारचा अर्थसंबोध चिन्हीत करते, हे नाम, विशेषण, क्रियाविशेषण, क्रियापद इ० प्रकारची उदाहरणे घेऊन लेखाच्या भाग १ मध्ये विशद केले आहे. अर्थ हा भाषेतील शब्दांचा अपरिहार्य घटक, प्राणतत्त्वच असतो - हे त्याने स्पष्ट झाले आहे. भाषा बोलणाऱ्याच्या मनातील आशयच विशिष्ट शब्दरूपांच्या जुळणीतून - त्यांच्या परस्परसंबंधांतून - अभिव्यक्त होत असतो - हे शरीरमानसशास्त्रीय क्रियांच्या विवेचनातून मी खुलासेवार मांडलेले आहे - ही भूमिका शास्त्रीयच आहे. भाषेचा केवळ रचनात्मक अभ्यास करताना अर्थाकडे दुर्लक्ष होत असेल, तर ते अयोग्य आहे. अर्थाभिव्यक्ती, अर्थसंदेशन व अनुभवजतन हीच मानवी भाषाव्यवहाराची उद्दिष्टे आहेत. अर्थविन्यास हा भाषाविज्ञानाचा गाभा आहे.

(४) ''पृथक्करणाची पद्धती हीच विज्ञानाची मूलभूत पद्धती म्हणायला हवी... हळूहळू तुकड्यातुकड्यांनी विश्लेषण करीत ज्ञान जमवीत जाणे, याला पर्यायी पद्धती विज्ञानापाशी नाही.'' (पृष्ठ १८)

पृथक्करण-पद्धतींच्या मर्यादा शास्त्रज्ञांच्या ध्यानात कशा आलेल्या आहेत, याबद्दलची उदाहरणे वस्तुत: माझ्या मूळ (उन्हाळा २००६) लेखात दिलेलीच आहेत. विशेषत: जीवसृष्टीशी संबंधित कोणत्याही विषयाच्या अभ्यासात पृथक्करण पद्धतीने सत्य हाती येत नाही. हे समग्र आकृतिवादी (तत्काळ प्रत्ययवादी) शास्त्रज्ञांनी अधोरेखित केले आहे. केवळ तुकड्यातुकड्यांनी विश्लेषण करीत गेल्यास, तुकड्यांच्या विशिष्ट जुळणीतून व त्यांच्या व्यामिश्र परस्परसंबंधांतून प्रकट होणारी सत्ये वा अर्थ लक्षात येत नाहीत - म्हणून अशा सर्व संभाव्य परस्परसंबंधांचा अभ्यास पृथक्करणपद्धतीबरोबरच करावा लागतो. भाषा ही तर मानवाची एक श्रेष्ठ निर्मिती आहे. म्हणून भाषेचा अभ्यास करताना शब्दरूपांच्या विशिष्ट जुळणीतून विशिष्ट आशय व्यक्त करण्याच्या मानवाच्या हेतुपूर्वक प्रयत्नांची दखल अभ्यासकाने घेतलीच पाहिजे. त्याला पर्याय नाही.

(५) ''(प्रा. कामत यांची) ही भूमिका भाषेच्या सामाजिक व सांस्कृतिक कार्यावर अधिक भर देणारी आहे.'' (पृष्ठ २७, टीप २)

माझ्या मूळ लेखात (उन्हाळा २००६, पृष्ठ १९) ''भाषेतील ध्वनिरूप प्रतिके केवळ सामाजिक चलन म्हणून वापरली जात नसून, ती व्यक्तीच्या अंतर्गत घडणीचीही माध्यमे बनतात.'' अशा शब्दांत भाषेचे द्विविध कार्य सांगून पुढे आंतरिक घडणीचे स्वरूप थोडक्यात वर्णन केले आहे. तथापि भाषेचे व्याकरण करताना तिचे सामाजिक (लिखित) रूपच विशेषत: अभ्यासिले जाते. त्यामुळे त्या व्याकरणविषयक लेखात सामाजिक सांस्कृतिक भूमिकेवर स्वाभाविकपणे भर दिला गेला आहे. प्रस्तुत लेखाच्या भाग १ मध्ये भाषिक वर्तनामागील शरीरांतर्गत प्रक्रियांचे स्वरूप स्पष्ट केले आहे. अभ्यासकाने दोन्ही अंगे सम्यक्‌रूपाने समजून घेतली पाहिजेत, हा दृष्टिकोण त्यामागे आहे.

(६) ''मानवाच्या मूलभूत भाषाशक्तीचा संबंध सामाजिक-सांस्कृतिक परिसराशी किंवा शारीरिक बौद्धिक वाढीशी नसून जनुकांशी असतो. भाषाशक्ती एक खूपशी स्वायत्त जैविक शक्ती असते. याचा भरपूर पुरवा अभ्यासकांकडे आज उपलब्ध आहे.'' (पृष्ठ १७)

प्रा० मालशे यांच्या या प्रतिपादनाबाबत काही मर्यादा स्पष्ट केल्या पाहिजेत. भाषेची जैविक शक्ती म्हणजे 'माणसाची श्रवण यंत्रणा आणि अनेक उच्चारक्षम, लवचीक अशी ध्वनियंत्रणा यांची मेंदूमधील अर्थपूर्ण परस्परसंबद्धता,' एवढा विस्तृत

अर्थ घेतला पाहिजे. या व्यवस्थेत कोठेही रचनात्मक त्रुटी वा कार्यदोष उद्‌भवल्यास भाषिक शक्ती आपोआप प्रकट होत नाही, हेही लक्षात घेतले पाहिजे - या संदर्भात पुढील उदाहरणे बोलकी ठरतील :

(अ) पूर्वीच्या काळात काही प्रदेशांतील विशिष्ट समजुती वा प्रथांमुळे काही मुलांना रानावनात सोडून दिले जात असे. अशी मुले किंवा अन्य कारणांमुळे विजन-वासात एकटी राहिलेली मुले मानवी भाषा बोलू शकत नाहीत, केवळ पशुपक्ष्यादिकांचे आवाज काढतात, असे आढळले आहे. अशा प्रकारचाच एक मुलगा रशियात नुकताच सापडल्याचे वृत्त 'पक्षी मुलगा' या शीर्षकाखाली उन्हाळा २००८ पृष्ठ ३२ वर उद्‌धृत केलेले आहे. यावरून मुलांना केवळ जैविक शक्तीमुळे आपोआप भाषा येत नाही, हे सिद्ध झाले आहे. भाषा येण्यासाठी ती भाषा बोलणाऱ्या व्यक्तींचा प्रत्यक्ष सहवास आवश्यक असतो. लहान मुलांच्या शारीरिक क्रियांचे उदाहरण याबाबतीत तुलनेसाठी उपयुक्त ठरेल. उपडी वळणे, सरपटणे, रांगणे, मान वर करून पाहणे, बसणे, उभे राहणे, चालणे इ० क्रिया कोणाचेही साहाय्य-मार्गदर्शन नसतानाही मूळ स्वाभाविकपणे करू शकते. भाषा बोलणे मात्र त्या प्रकारे स्वाभाविकपणे येत नाही.

(ब) जन्मत: बहिरी असलेली मुले, मुखातील ध्वनियंत्रणा नीटनेटकी असूनही, बोलू शकत नाहीत. ती फक्त हुंकारध्वनी (कुनिंग) काढू शकतात. बधिरमूक मुलांच्या शाळेत जाऊन शोध घेतल्यास, बहिरेपणाचे अनेक प्रकार असतात हे लक्षात येते. अंशत: बहिरेपण असल्यास कमी-अधिक प्रयास केल्यानंतर काही प्रमाणात भाषिक प्रगती होऊ शकते. श्रवण-साहाय्यक साधने त्यासाठी उपयोगी पडतात. पण आंतरकर्णात मोठा दोष असेल तर कोणतीही भाषा मुळीच बोलता येत नाही. (माझ्या परिचयातील एका सुशिक्षित कुटुंबातील दोन मुलांचे उदाहरण येथे देण्यासारखे आहे. एक मुलगा व दुसरी मुलगी अशी दोन्ही मुले, आंतरकर्णातील शंखकवच मुळीच विकसित न झाल्यामुळे काहीच बोलू शकत नाहीत, हे मी प्रत्यक्ष पाहिलेले आहे. ही मुले अन्यथा सुदृढ, देखणी व हुशार आहेत, दोघेही मर्यादित प्रमाणात पुस्तक वा अन्य मजकूर वाचून अर्थ समजू शकतात. चित्रकला, डिझायनिंग, कशिदाकाम, इमारतीचा आराखडा तयार करणे अशा 'दृश्य' कला-कारागिरी शिकून उदरनिर्वाहाचा व्यवसायही (इतरांच्या मदतीने) आज ती करीत आहेत; पण बोलू शकत नाहीत. इत्यर्थ असा की, इतरांचे बोलणे ऐकता आल्यासच अनुकरणाने भाषा शिकता येते - त्यासाठी स्वत:चे उच्चारणही ऐकू यावे लागते.

(क) १९३० साली कॅलिफोर्नियामध्ये जिनी नावाच्या १३ वर्षांच्या मुलीची एक असामान्य कहाणी उजेडात आली. तिचे वडील अत्यंत विक्षिप्त, संतापी आणि हुकूमशाही वृत्तीचे होते. त्यांनी तिला वयाच्या विसाव्या महिन्यापासून एका छोट्या

कोठडीत नग्नावस्थेत पूर्णतया एकटे कोंडून ठेवले होते. तिला फक्त लहान मुलाचे अन्न व दूध दिले जाई; पण तिच्याशी अवाक्षरही बोलायला सर्वांना सक्त मनाई होती. बाप फक्त अधूनमधून तिच्यावर गुरगुरे, कुत्र्यासारखा भुंके. बाकी कोणताही मानवी आवाज तिला ऐकायला मिळत नव्हता, मानवी सहवासही नव्हता. परिणामी तिचा सर्व विकास खुंटलेला होता, एक शब्दही तिला बोलता येत नव्हता. जिनीची ही हकिगत प्रसिद्ध झाल्यावर अनेक तज्ज्ञांनी तिची तपासणी केली. शक्य ते उपचारही केले. त्यात सूझन कर्टिस नावाची भाषाविकास तज्ज्ञही होती. तिने खूप प्रयत्न केल्यावर १३ वर्षांची जिनी फक्त तीन शब्दांचे सोपे वाक्य उच्चारू शकली. सर्वनामांचा उपयोग, प्रश्नार्थक वगैरे अन्य वाक्यरचना ती मुळीच शिकू शकली नाही. शास्त्रीय चाचण्यांतून असे आढळले, की ती मेंदूच्या उजव्या गोलार्धाचा उपयोग भाषेसाठी करीत होती. माणसांचे चेहेरे ओळखणे इ० उजव्या गोलार्धाच्या क्रिया तिला जमू लागल्या; पण भाषा बोलण्यासाठी आवश्यक असलेला डाव्या गोलार्धाचा विकास खुंटलेला होता. जिनीचे हे प्रत्यक्ष उदाहरण भाषिक शक्ती आणि विकास या संदर्भात मोठा पुरावा मानले जाते. कोणतीही भाषा केवळ जैविक शक्तीच्या बळावर येत नाही. त्यासाठी बोलणाऱ्या व्यक्तींचा सतत सहवास लाभावा लागतो. म्हणजे भाषा ही सामाजिक निर्मिती आहे. सतत सहवासातूनच माणूस 'बोलणे' शिकतो. या अर्थाने भाषा हे 'संपादित वर्तन' आहे. भाषा शिकण्याचा एक निर्णायक कालखंड असतो. एरिक लेनबर्ग याने वयाची २ ते १२ वर्षे हा विशेष संवेदनशील काळ मानला आहे. (सूझन कर्टिस हिचे जिनी संदर्भातले पुस्तक - 'ए सायकोलिंग्विस्टिक स्टडी ऑफ अ मॉडर्न डे वाइल्ड चाइल्ड' १९७७ साली प्रसिद्ध झाल्याची नोंद आहे.)

(ड) भाषेच्या संदर्भात कायमची अपसामान्य स्थिती असणारे उदाहरण (इन्फायटील अयुस्टीम) म्हणजे 'शैशवारब्ध स्वमग्नता' या प्रकारच्या मनोविकृतीत आढळते. या प्रकारच्या मुलाच्या तपासणीत कोणतेही शारीरिक व्यंग आढळत नाही; पण मूल इतरांना प्रतिसाद देत नाही. कुणाच्याही नजरेला नजर भिडवीत नाही. इतरांशी कोणत्याच प्रकारचा संपर्क वा देवघेव करीत नाही. त्यामुळे स्वत:च्या आईवडिलांशीही त्याचे भावनिक नाते जुळत नाही. आपुलकी - प्रेम या भावनाच त्याला समजत नाहीत. समवयस्कांशी बोलणे-खेळणे-मैत्री होत नाही. ते केवळ स्वत:च्याच जगात मग्न असते. परिणामत: त्याचा भाषिक विकास होत नाही. दुसऱ्याचे बोलणे समजून घेणे व उत्तर देणे साधत नाही. त्यातून काही विचित्र लकबी निर्माण होतात. उदाहरणार्थ, त्याच्याशी बोलणाऱ्याचे फक्त शेवटचे शब्द पुनरुक्त करणे, तू-मी-तो यांची उलटापालट करणे, विचित्र हालचाली करणे, खेळण्यांनी नीट न खेळता ओढाओढ, फेकाफेक करणे इ० त्याच्या शारीरिक क्रिया कधी फार मंद, तर कधी झटका आल्यासारख्या वेगाने-

अतिरिक्त जोरदारपणे होतात. माणसांऐवजी भलत्याच अनाकर्षक वस्तूकडे टक लावून बघण्याची प्रवृत्ती दिसते. त्यामुळे प्रौढ वयातही त्याचे वर्तन व भाषा फार कनिष्ठ दर्जाची राहतात. अशा मुलांमध्ये मेंदूचा डावा गोलार्ध आयुष्यभर फार दुबळा राहिलेला आढळतो. ही एक भयानक विकृती असल्याचे शास्त्रज्ञांनी नमूद केले आहे. भाषाविषयक सर्व इंद्रिये सुस्थितीत असूनही, इतरांशी संपर्क होऊ शकत नसल्यामुळेच भाषिक आणि इतर तज्जन्य विकास घडत नाहीत हा दुर्दैवाचा भाग या प्रकारात दिसून येतो. या विकृतीला आनुवंशिक घटक कारणीभूत असल्याचा निष्कर्ष काही अभ्यासकांनी काढला आहे. (माझ्या परिचयाच्या एका कुटुंबात असे मूल असून, त्याच्या आईच्या कुटुंबशाखेतही असेच मूल आहे, असे ऐकले आहे.)

या उदाहरणावरून निष्कर्ष असा निघतो, की भाषा केवळ जैविक पातळीवर निर्धारित होत नाही. उपडी वळणे, सरपटणे इ० शारीरिक क्रियांची 'जैविक योजना' माणसाला नैसर्गिक उत्क्रांतिप्रक्रियेतून लाभली आहे; पण भाषा व भाषिक विकास त्या प्रकारे निर्धारित नाही. भाषेमध्ये असलेली अर्थयुक्त संकेतव्यवस्था प्रत्येक मानवी अपत्याला बोलणाऱ्या इतरांच्या दीर्घ सहवासातून अनुकरणाने शिकावी लागते. आणि असा निकट सहवास मुलाच्या वयाच्या विशिष्ट निर्णायक काळात लाभणे आवश्यक असते.

भाषा शिकण्याच्या आणि भाषिक विकासाच्या आड येणाऱ्या उपरोक्त उदाहरणांमधील घटकांचा (अनुक्रमे) सामाजिक-एकटेपण, शारीरिक (ऐकणे-बोलणे या यंत्रणांमधील) उणिवा, निर्णायक कालखंडात भाषिक सहवासाचा अभाव आणि मानसिक अपसामान्यत: अशी नोंद करता येईल.

जनुकीय कारणांमुळे वेगवेगळ्या पातळ्यांवरील मतिमंदता आणि विकृतिलक्षणेही निर्माण होतात. अशा मुलांच्या शारीरिक, सामाजिक व बौद्धिक विकासाबरोबर भाषिक विकासातही विलंबन, मागासलेपण आणि कुंठितता आढळते. त्यामुळे अशा अपसामान्य (अबनॉर्मल) मुलांचा अभ्यास स्वतंत्रपणे केला जातो. सामान्यजनांची भाषा, तिची विकासप्रक्रिया आणि भाषेच्या घडणीचा व्याकरणात्मक अभ्यास यातून अपसामान्यांना वगळले जाते. कारण त्यांच्या एकूण वर्तनातच केंद्रीय पातळीवरील व्यवस्थात्मक संघटन वा परस्पर मेळ आढळत नाही - असे संघटन अस्तित्वातच येऊ शकत नाही. संघटनतत्त्व हरवले म्हणजे समग्र भाषिक व्यवहाराच कोलमडतो - ही नकारात्मक बाजू स्पष्ट समजून घेतल्यावर भाषेच्या कोणत्याही अभ्यासात 'अर्थ संघटन' या तत्त्वाचे महत्त्व विशेषपणे लक्षात येईल. अर्थ म्हणजे मृगजळ नव्हेच.

मानवाचे वैयक्तिक व सामाजिक अशा दोन्ही पातळ्यांवरील जीवन व विकास यांचा अशा रीतीने भाषेशी अतूट संबंध असतो आणि तो अनुभवांच्या, आकलनाच्या

आणि आविष्काराच्याही उच्चतम संघटनक्रियेवर आधारित असतो. 'सामर्थ्य आहे संघटनेचे' हे समर्थ रामदासांचे वचन येथे वेगळ्या अर्थाने प्रतीत होते.

■

102/4, एन अशोक नगर, परांजपे मार्ग, वझिरा, बोरीवली (प०) मुंबई 400 092.

संदर्भ :

अर्जुनवाडकर, कृ. श्री. १९८७. मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद. सुलेखा प्रकाशन, पुणे ९.

आचार्य, मा. ना. १९९०. मराठी व्याकरण विवेक. संजय प्रकाशन, पुणे ४.

कामत, उ. रा. २००६. 'व्याकरणविषयक एक विचार', भाषा आणि जीवन. वर्ष २४, अंक २, उन्हाळा २००६, पृ. १७-२८.

दामले, मो. के., १९११. शास्त्रीय मराठी व्याकरण.

मालशे, मिलिंद, २००७. 'व्याकरण आणि अर्थ : आधुनिक भाषा वैज्ञानिक दृष्टिकोण', भाषा आणि जीवन. वर्ष २५, अंक १, हिवाळा २००७ पृ. १५-३०.

Morgan, C.T. King, R.A., Weisz, J.R. Scopler, John. 1993. Introduction of Psychology (Revised 7th Edition) Tata McGraw Hill Publication, New Delhi.

Thompson, R.F. 1967. Foundations of Physiological Psychology. Harper International Publication, New York.

**परिषद-वार्ता**

१. श्री० लछमन हर्दवाणी यांनी संस्थेला ५०० रु.ची देणगी दिली आहे.

२. रमणबाग मित्रमंडळ (१९३९-१९४६ बॅच) तर्फे १४०० रु.ची संस्थेला देणगी दिली आहे.

परिषद या सर्वांची आभारी आहे.

# सहजवाचन : आकलनशास्त्रीय (कॉग्निटिव्ह) दृष्टिकोण

रमेश पानसे

वाचता येणे, चांगले वाचता येणे ही गोष्ट उन्नत आयुष्य जगण्याचे सामर्थ्य माणसाला बहाल करीत असते. चांगले वाचनकौशल्य अवगत झालेली माणसे ज्ञानाच्या क्षेत्रात सहजपणे प्रवेश करू शकतात. ज्ञान हे माणसाला संपन्न आयुष्य जगण्यासाठी साहाय्य करीत असते. पण त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट अशी की ज्ञानप्राप्ती, सततची ज्ञानप्राप्ती ही माणसाची नैसर्गिक गरज असते. त्यासाठी ज्ञानप्राप्तीची उपजत प्रेरणा मानवाला प्राप्त झाली आहे; आणि ज्ञानप्राप्तीची नैसर्गिक प्रक्रिया ही अखंडपणे आयुष्यभर चालू असते. या प्रक्रियेला वेग देण्याचे, आकार देण्याचे कार्य वाचनक्षमता करीत असते. वाचनाने ज्ञानवृद्धी करणे ही माणसाच्या जीवनातली एक उच्च पातळीची प्रक्रिया आहे. यामुळेच किंबहुना, आपण शालेय शिक्षणाची सुरुवातच वाचन (लेखन आणि गणन) यांनी करीत असतो. मुलांना चांगले वाचता येऊ लागले म्हणजे त्यांची पुढील शालेय शिक्षणाची वाट सुकर होते. याउलट, चांगले वाचता येत नसेल तर तो शालेय शिक्षणातील सर्वांत मोठा अडथळा ठरतो. किंबहुना, शालेय शिक्षणात मागे पडणाऱ्या मुलांच्या बाबतीत त्यांना चांगले वाचता येत नाही, हे एक प्रमुख कारण असते.

वाचता येणे, चांगले वाचता येणे याचा अर्थ आशय समजून वाचता येणे होय. ही बाब शालेय शिक्षणाच्या सुरुवातीच्या अवस्थेत अनेक विद्यार्थ्यांना अत्यंत कठीण जाते. शाळेच्या पहिली-दुसरीच्या वर्गांमधून डोकावले तर अशीही मुले आढळतात, की ती क्रमिक पुस्तकातील धडा, घडाघड वाचतात; पण त्यांना मध्येच थांबवून एखादा शब्द, एखादे वाक्य स्वतंत्रपणे वाचायला सांगितले तर ते येत नाही. किंवा क्रमिक पुस्तकाबाहेरील दुसरे काही वाचायला सांगितले तर तेही वाचता येत नाही. शिवाय त्यांनीच वाचलेल्या वाक्यांचा अर्थही त्यांना कित्येकदा सांगता येत नाही. याचा अर्थ ती मुले शब्द नि वाक्ये पाठ करून वाचत असतात; पण या वाचनाच्या मागे असलेला आशयाचा पडदा त्यांच्याबाबतीत उघडलेलाच नसतो.

शालेय शिक्षणाच्या सुरुवातीच्या काळात अनेक मुलांना वाचायला शिकणे हे अतिशय कठीण जाते. ज्यांना चांगले वाचता येते अशांना, म्हणजे त्याच्या पालकांना

किंवा शिक्षकांना, असे का होते हे बऱ्याचदा समजून येत नाही. वाचन एकदा अंगवळणी पडले की त्याची सुरुवातीची अत्यंत अवघड अशी वाट आपण कशी पार करून गेलो हे आपल्या लक्षात राहत नाही. वास्तविक पाहता सुरुवातीची वाचनवाट ही अवघडच असते. काहींना ती सहज चालून जाता येते; ज्यांना येत नाही त्यांच्या बौद्धिक क्षमतेबाबतच अनाठायी शंका घेतल्या जातात. बऱ्याचदा अशा शंका प्रत्यक्षपणे वाचन शिकण्या-शिकवण्याच्या पद्धतींविषयी उपस्थित करायला हव्यात. ज्या पद्धतीने मुले वाचन लवकर शिकत नाहीत, तीच पद्धत अधिक काळ वापरून, फारसे काही साधत नाही. पद्धत बदलून केवळ अधिक मुले अधिक वेगाने म्हणजे कमी वेळात वाचनक्षमता कशी अवगत करू शकतात हे ग्राममंगल संस्थेने तयार केलेल्या प्राथमिक वाचन-लेखन पुस्तकांच्या प्रत्यक्ष वापरांतून दिसून आले आहे.

**वाचन शिकण्याच्या दोन पद्धती**

वाचन-शिक्षणाची सुरुवात कशी करावी याबाबतच्या दोन पद्धती, आज शालेय शिक्षणात अस्तित्वात आहेत. पहिली आणि सार्वत्रिकरीत्या वापरात असलेली पद्धत म्हणजे मुळाक्षर पद्धत. या पद्धतीत आपण मुलांच्या अक्षरज्ञानापासून सुरुवात करतो. सुरुवातीला अ, आ, इ, ई... अशी स्वरांची ओळख, त्यानंतर क,ख,ग,घ.... अशी व्यंजनांची ओळख; त्यानंतर क,का,कि,की... अशी बाराखडी आणि मग एकदा हा कच्चा माल हाती आला की त्याच्या आधारावर शब्दांकडे वळायचे ! ही पद्धत मुलांना अतिशय कंटाळवाणी वाटते. कारण त्यात 'समजावून घेण्याचे' असे आव्हान काहीच नसते. केवळ पाठांतर करावे लागते. दुसरी पद्धत म्हणजे अर्थपूर्ण आणि ओळखीच्या शब्दांपासून वाचन-शिक्षणाची सुरुवात करणे. अक्षरांना 'अर्थ' नसतो; पण अक्षरांच्या साहाय्याने बनलेले जे शब्द असतात, त्यांना मात्र 'अर्थ' असतो. 'हात' शब्द उच्चारला की शब्दोच्चाराच्या बरोबरीने त्याचा अर्थही मुलांच्या मनात शिरतो. त्यामुळे त्याविषयी जवळीक वाटते. शिवाय 'हात' या शब्दाने व्यक्त केलेल्या अर्थाची काही एक दृश्य प्रतिमा मुलांच्या दीर्घकालीन स्मृतिघटात अगोदरच असल्यामुळे, शब्द उच्चारल्याबरोबर लगेच त्याचा अर्थ या दीर्घकालीन स्मृतितील प्रतिमेशी तादात्म्य पावतो आणि मुलांना शब्दोच्चार ओळखीचा वाटतो. हा शब्दोच्चार ज्या दृश्य अक्षरसमुच्चयांतून आला तो अक्षरसमुच्चय, ती शब्दाकार प्रतिमाही मुलाच्या ओळखीची होते. मुले तो शब्द वाचू लागतात. त्यामुळे ओळखीच्या अर्थपूर्ण शब्दांपासून आणि त्यापासून तयार झालेल्या छोट्या छोट्या वाक्यांपासून वाचन-शिक्षणाची सुरुवात करणे, कमी कष्टाचे नि कमी वेळखाऊ असते; आणि ते कंटाळवाणे नाही तर आनंददायक असते असा अनुभव येतो. शब्दार्थ समजणे आणि वाक्याशय आकलन

होणे, हा या पद्धतीचा पाया आहे. या पद्धतीची पाठराखण करणारे असे मानतात की, वाचनाचा हेतू जर अर्थाची रचना करणे असा असेल, आणि जर अर्थ हा प्रथमत: शब्दस्तरावर आढळत असेल तर वाचन-शिक्षणाचा-आरंभ हा शब्दस्तरावरून झाला पाहिजे. ओळखीचा अर्थपूर्ण शब्द वाचायला शिकणे आणि त्याचा विविध वाक्यांमध्ये वापर करून पाहणे यातून मुले तो शब्द पूर्णत: आपलासा करतात आणि स्वतंत्रपणे ओळखायलाही शिकतात. वाचनात, चांगल्या वाचनात, शब्द केवळ उच्चारता येणे पुरेसे नसते तर ती अर्थआकलनाने उच्चारता येणे आवश्यक असते.

**सहजवाचन**

वाचता येणे, चांगले वाचता येणे याचा आणखी एक अर्थ असा, की वाचन विनासायास, अगदी सहजतेने करता येणे. सहजवाचन म्हणजे नेमकेपणाने आणि वेगाने केलेले वाचन. आपल्याला वाचनकौशल्य आत्मसात झाले असे आपण जेव्हा म्हणतो तेव्हा आपल्याला या दोन्ही गोष्टी चांगल्या येऊ लागलेल्या असतात. वाचत असलेल्या शब्दांचा अर्थ (आणि वाक्यांचा आशय) पाणी झिरपावे अशा सहजतेने आपल्या मनात नेमकेपणाने शिरत जातो; आणि म्हणूनच आपण वेगाने पुढे सरकतो, वेगाने वाचत जातो. ज्याचा अर्थ आपल्याला उमगत नाही अशा शब्दाशी आपण अडखळतो. आपण तो पुन्हा वाचतो, तोवरच्या एकूण वाचनाने जो आशय-संदर्भ आपल्या मनात तयार झालेला असतो, त्या संदर्भात आपण तो शब्द 'समजावून' घेतो (किंवा चक्क शब्दकोशाचा आधार घेतो!) आणि मगच पुढे सरकतो. मात्र असा शब्द आपल्या वाचनाचा वेग कमी करतो. जितके कठीण शब्द समोरच्या धड्यात असतील तेवढे मुलांचे वाचन अडथळ्याचे नि म्हणून मंदवेगी असते. पुन्हा असे की असे अडथळे येणारे मंदवेगी वाचन हे एकूण आशय आकलनात अडचण निर्माण करीत असते. बऱ्याचदा शालेय क्रमिक पुस्तकांतून मुलांच्या तोपर्यंतच्या भावजीवनाशी संबंधित नसलेले शब्द पदोपदी आढळतात (आणि वाक्येही फार मिश्र असतात) त्यामुळे अर्थातच मुलांच्या आशय-आकलनाला अडथळा निर्माण होतो.

वाचनाच्या कामात, वेगाने वाचता येणे आणि नेमकेपणाने म्हणजे अर्थ उमगून वाचता येणे या दोन्ही गोष्टी खूपच महत्त्वाच्या आहेत. त्यांच्या पायावरच सहजवाचनाची इमारत उभी राहते. वेगाने वाचता येण्याचा आणि नेमकेपणाने वाचण्याचा संबंध केवळ शब्दार्थ माहीत असण्याशी नाही. त्यात इतरही काही घटक असतात. उदाहरणार्थ, शब्द वाचत असताना शब्दांवरून दृष्टीही फिरत असते आणि शब्दार्थ समजावून घेण्याचा संबंध व्यापक अशा शब्दानुभवाशी असतो. या दोन्ही दिशांनी आकलनशास्त्रात काही संशोधन व प्रयोग झालेले आहेत.

मुळात ऐकलेली भाषा समजावून घेणे आणि लिहिलेली भाषा समजावून घेणे यात एक मूलभूत फरक आहे. ऐकलेली भाषा समजावून घेताना, ती एक नैसर्गिक प्रक्रिया असल्यामुळे, मुलं हे कौशल्य आपले आपण फार लवकर आत्मसात करतात. पण वाचनाचे तसे नसते. वाचन ही अधिक गुंतागुंतीची क्रिया असते. लिहिलेली भाषा समजावून घ्यायची असते तेव्हा त्यात हे शब्दार्थांचे आकलन तर येतेच; पण आणखीही दोन गोष्टी येतात. एक म्हणजे, इथे डोळ्यांचेही काम असते. वाचताना शब्दांवरून नजर फिरवीत जावे लागते; आणि दुसरे म्हणजे शब्दाक्षरे ओळखण्याचे आणि ते उच्चारण्याचे कामही करावे लागते. वेगळ्या भाषेत सांगायचे झाले तर येथे केवळ 'डोक्याचे' काम नसते तर त्याचबरोबर 'डोळ्यांचे' नि 'तोंडाचे'ही काम असते. स्वरेंद्रियात काही दोष असले तर वाचन सुलभ नसते हे आपल्याला माहीतच आहे. तसेच काही वेळेस डोळ्यांमध्ये दोष असल्यासही मुलांना वाचणे अवघड जाते.

आपण जेव्हा सहजवाचन करीत असतो, तेव्हा आपण सहजपणे दर मिनिटाला तीनशे शब्द, म्हणजेच दर सेकंदाला पाच शब्द वाचू शकतो. परंतु अशी साधी वाचनक्रिया करीत असताना अनेक गुंतागुंतीच्या गोष्टी घडत असतात आणि या गुंतागुंतीचा वेध घेण्याचा प्रयत्न या क्षेत्रात काम करणाऱ्या मानसशास्त्रज्ञांनी घेतला आहे.

आपण वाचन करीत असताना आपल्या डोळ्यांची होणारी हालचाल हीच मुळी एक गुंतागुंतीची बाब आहे. आपण जेव्हा वाचत असतो तेव्हा आपले डोळे लिखित मजकुरावरून सहज फिरत जातात असे आपल्याला सर्वसाधारणपणे वाटते; पण ते तसे नसते. डोळे प्रत्येक शब्दावर क्षणभर थबकतात, थांबतात. मानसशास्त्रात या थबकण्याचा 'थांबा' - पॉझ फिक्सेशन - असे म्हणतात. त्यानंतर लगेचच डोळे पुढील शब्दांवर 'उडी' मारतात आणि तिथेही क्षणभर विसावतात, मग पुन्हा पुढची उडी, अशी ही प्रक्रिया घडत असते. काही वेळेस असेही घडते की पुढे उडी मारण्याऐवजी डोळे परत मागील शब्दाकडे वळतात. हे मागे परतणे - रिग्रेशन, तो शब्द नीट ध्यानात न आल्यामुळे, त्याची क्षणभरात चटकन ओळख न पटल्याने घडू शकते. याप्रकारे डोळ्यांची होणारी हालचाल मोजण्याचे संगणकनियंत्रित यंत्रही मानसशास्त्रज्ञांनी विकसित केले आहे. त्याला 'आयट्रॅकर' असे म्हणतात. या यंत्राचा वापर करून शोध घेतला तेव्हा संशोधकांना असे आढळले की, सहजवाचन करू शकणाऱ्या कुशल वाचकाच्या बाबतीत थांब्याचा कालावधी हा २५० मिलिसेकंद म्हणजे पाव सेकंद इतका असतो. कुशलवाचक हा वाचताना ८० टक्के अर्थपूर्ण अशा नामे, क्रियापदे इत्यादी विशेषक मॉडिफायर्ज शब्दांवर आणि ४० टक्के कार्यरूपी (फंक्शन) शब्द म्हणजे उपपदे

(आर्टिकल्ज्) उभयान्वयी अव्यये (कंजंक्शन्ज्) यावर थांबा घेत असतात. वाचनाच्या एकूण वेळातील ९० ते ९५ टक्के वेळ हा केवळ त्या 'थांब्यां'साठी खर्च होत असतो. बहुतेक शब्दांच्या बाबतीत पुढे उडी टाकली जाते (या प्रत्येक उडीसाठी मोजलेला सरासरी कालावधी १५ मिलिसेकंद इतका आहे). पण मागे टाकलेल्या उड्यांचे प्रमाणही काही कमी नसते. १० ते १५ टक्के उड्या या मागे परतवणाऱ्या असतात. या साऱ्या संशोधनातून आढळलेली गमतीची गोष्ट अशी की वाचनातून अर्थ-आशय-माहिती-ज्ञान इत्यादी जे काही प्राप्त केले जाते ते सारे या थांब्यांच्या कालावधीत. शब्दांवरील उड्यांच्या कालावधीत मात्र नवी माहिती आत्मसात केली जात नाही.

मुलांच्या सुरुवातीच्या वाचनात, मागे परतवणाऱ्या उड्यांमुळे मात्र खूप मोठा अडथळा निर्माण होतो. भराभर शब्द-वाचन करीत असतानाच, मनाच्या पातळीवर यातून आशयबोध तयार करीत जाण्याची इंटिग्रेशन प्रक्रियाही चालू असते.

थांब्यावरच्या क्षणभराच्या विसाव्याच्या कालावधीतच अर्थ-आशयज्ञान प्राप्त होते, असे आपण म्हणतो तेव्हा त्याचीही मानवी मनात होणारी प्रक्रिया समजावून घेणे उपयुक्त आहे. आकलनविषयक दृष्टिकोणातून पाहिले असता, वाचनक्रिया ही एक प्रकारची समस्या-सोडवणुकीची प्रक्रिया आहे. कोणत्याही समस्या-सोडवणूक प्रक्रियेला काही उद्दिष्ट असते. समस्या असण्याची एक स्थिती आणि समस्या सुटल्यानंतरची म्हणजे अंतिम उद्दिष्ट-पूर्तीची स्थिती गृहीत धरल्या तर समस्या सोडविण्याच्या प्रक्रियेत आपण पहिल्या स्थितीकडून दुसऱ्या (अंतिम) स्थितीकडे जात असतो. त्यासाठी काही मार्गांचा, काही साधनांचा वापर करीत असतो. समोर काही छापील मजकूर आहे, ही सुरुवातीची स्थिती मानता येईल. वाचनातून अंतिमत: अर्थाचे आकलन करून घ्यायचे आणि तो आपल्या दीर्घकालीन स्मृतीत साठवून योग्य त्या वेळी वापरासाठी सज्ज ठेवण्याचे आपले उद्दिष्ट असते; ही अंतिम स्थिती होय. वाचनाचे कौशल्य आणि शब्द, शब्दांचे रूप, शब्दांचे अर्थ, व्याकरणाचे नियम इत्यादींच्या परिचयाचे साधन आपल्या हाती असते. यासंबंधीचे सारे ज्ञानही आपल्या दीर्घकालीन स्मृतिकोशात साठविलेले असते. समोर असलेल्या मजकुरातून अर्थ शोधण्याचा प्रयत्नच वाचनाकरवी आपण करीत असतो. आणि ही प्रक्रिया मात्र अल्पकालीन स्मृतीच्या स्तरावर होत असते. समोरच्या शब्दांचा अर्थ आणि दीर्घकालीन स्मृतिकोशातील तत्संबंधीचे पूर्वीचे ज्ञान यांना अल्पकालीन स्मृतीत आणून, ही प्रक्रिया घडविली जाते. जेव्हा आपण सहजतेने वाचन करू लागतो तेव्हा खूप मोठ्या प्रमाणावरील माहिती दीर्घकालीन स्मृतीतून अल्पकालीन स्मृतीत आणून वेगवेगळ्या स्तरांवर म्हणजे, दृष्टिगोचर, व्याकरणीय, संकल्पनात्मक, शब्दसंग्रह यांच्या स्तरांवर एकाच वेळी काम करावे लागते.



अनुक्रमणिका

ही सारी प्रक्रियाच अल्पकालीन व दीर्घकालीन अशा दोन तऱ्हेच्या स्मृतिक्षमतांशी संबंधित आहे. विशेषत: प्रत्येक थांब्यावर ही संपूर्ण प्रक्रिया घडून येत असते. त्यामुळेच वाचनक्रिया ही तशी गुंतागुंतीची प्रक्रिया झालेली असते. त्याचा खूप मोठा ताण मर्यादित साठवणशक्ती असलेल्या अल्पकालीन स्मृतिकोशावर पडत असतो. मुलांना वाचन शिकणे एवढे कठीण का जाते, हे यावरून लक्षात येईल. मोठ्यांच्या बाबतीत, विशेषत: ज्यांना चांगला वाचन-सराव आहे अशांच्या बाबतीत ही प्रक्रिया सहजतेने घडून येते. शिवाय असा वाचक वेळोवेळी आपल्याच वाचनकृतीला त्रयस्थतेने न्याहाळून आपण जे वाचतो आहोत ते आपल्याला कळते आहे ना आणि आपण लावीत असलेला शब्दार्थ-वाक्यार्थ-भावार्थ योग्य आहे ना याची पडताळणी करू शकतो. ती शक्यता, नव्याने वाचायला शिकणाऱ्यांच्या बाबतीत मात्र नसते. कारण त्यासाठी लागणारा पूर्वीचा व्यापक 'शब्दानुभव' नसणे हीच त्याची खरी अडचण असते.

**आशय आकलन-प्रक्रिया**

वाचनामध्ये जेव्हा, क्षणभरासाठी का होईना, एका शब्दावर नजर स्थिर होते. (थांबा) तेव्हा तो शब्द ओळखण्याची प्रक्रिया घडावी लागते. शब्द ओळखण्याच्या प्रक्रियेत दोन उपप्रक्रिया अनुस्यूत असतात. पहिली शब्दोच्चाराने अर्थ-आकलनाची (इनिशियल एन्कोडिंग) आणि दुसरी मेंदूमधील दीर्घकालीन स्मृतिकोशातील शब्दसंग्रहात शिरण्याची. पहिल्या उपप्रक्रियेत समोरच्या लिखित अक्षरांकित शब्दाचे रूपांतर दृष्टिगोचर प्रतिमेत केले जाते. दुसऱ्या उपप्रक्रियेत, ही प्रतिमा वाचक आपल्या दीर्घकालीन स्मृतिकोशातील विविध शब्दप्रतिमांशी ताडून पाहत असतो. तेथे अशा शब्दांच्या विविध अर्थच्छटांसहित प्रतिमा साठविलेल्या असतात. त्याचप्रमाणे वाचकाच्या विशिष्ट भाषेतील व्याकरणाच्या सर्व रचनाही साठविलेल्या असतात. हा एक प्रकारचा अबोध मनातील शब्दकोशच असतो. जेव्हा वाचलेल्या शब्दाची दृश्य-प्रतिमा या शब्दकोशातील प्रतिमेशी जुळून येते तेव्हा शब्दओळखीची प्रक्रिया पूर्ण होते. शब्दवाचनातील वैशिष्ट्यपूर्ण अशी ही प्रक्रिया असते. मात्र जर शब्दार्थ धूसर, गोंधळाचा असेल तर त्यातल्या त्यात ज्या शब्दाशी तो जवळीक साधेल त्या शब्दार्थाची निवड केली जाते. या प्रक्रियेस अर्थ उलगडण्याची प्रक्रिया असे म्हणतात. (डिकोडिंग)

शब्दार्थाप्रमाणेच वाक्यार्थ-शोधनाचीही प्रक्रिया असते. आपण वाचत असलेल्या मजकुरातील वाक्यार्थ लक्षात घेऊन त्यांच्या एकत्रितपणाने संपूर्ण मजकुराचा मानसिक स्तरावरील प्रतिमांकित आशय वाचक शोधत असतो. या प्रक्रियेचा शेवट अखेरीस संपूर्ण मजकुराचा आशय समजण्यात होतो. अर्थातच हा समजलेला आशय आपल्या दीर्घकालीन स्मृतिकोशात जाऊन बसतो. मात्र हे होत असताना प्रत्येक वाक्याचा अर्थ

स्वतंत्रपणे किंवा सर्व वाक्यांचा मिळून एकत्रित अर्थ स्मृतिकोशात जात नाही तर त्याचा आशय कोशात साठून राहतो.

या मजकुराचा अर्थ उलगडण्याच्या प्रक्रियेतही दोन उपप्रक्रिया असतात. एक सरळ सरळ वाचलेल्या मजकुरातील अर्थ-शोधन प्रक्रिया आणि दुसरी त्याचीच मानसिक पातळीवर घडणारी प्रक्रिया. वाचक केवळ आपण वाचत असलेलेच वाक्यार्थ उलगडून घेतो असे नव्हे तर, वाचनविषयाशी संबंधित अशी मनामध्ये अगोदरच साठवलेली जी माहिती असते तिच्याशी नवीन माहिती तो जोडत जातो. त्यासाठी नवमाहितीच्या आधारे ही साठविलेली माहितीही कृतिशील होते व त्यातून नवी ज्ञानरचना घडत जाते. जर ती कृतिशील झाली नाही तर वाचलेले फारच थोडे लक्षात राहते. साहजिकच या नवज्ञानरचनेच्या प्रक्रियेत आधी साठविलेल्या माहितीचे महत्त्व अनिवार्य असते. हे साठविलेले ज्ञान आणखी एका कारणाने वाचन-क्रियेत महत्त्वाचे असते. आपण वाक्ये एकापाठोपाठ जेव्हा वाचत जातो तेव्हा कित्येकदा त्यांचा अर्थ परस्परांशी जोडताना, काही अद्ययावत माहितीचा आधार घेत असतो. उदाहरणार्थ, समजा अशी दोन वाक्ये एखाद्या कादंबरीत वा कथेत आपण वाचली; ''मोठा गडगडाट होऊन अचानक पाऊस सुरू झाला. तिने शेजारच्या दुकानाचा आसरा घेतला.'' या वाक्यांमधल्या अनेक शब्दांचे अर्थ आपणाला अगोदरच माहीत असतात. उदाहरणार्थ, गडगडाट हा 'ढगांचा गडगडाट' आहे. पाऊस अचानक सुरू होतो. पावसामुळे आपण भिजतो, आपल्याला भिजायचे नसते म्हणून आपण जवळच्या आसऱ्याला जातो. कोणी एक 'ती' रस्त्यातून चालली आहे. रस्त्याच्या कडेला दुकाने आहेत. दुकानात उभे राहिल्यास पाऊस लागत नाही. अशी कितीतरी माहिती अगोदरच आपल्या दीर्घकालीन कोशात साठलेली असल्यामुळे या दोन वाक्यांचा संबंध बांधताना ही सारी माहिती आपल्या पूर्वस्मृतीची बेगमी असते. या बेगमीशिवाय वाचन अर्थपूर्ण होत नाही; किंवा या बेगमीशिवाय आपण जे वाचतो त्याचे पूर्णांशाने आकलन होत नाही.

**व्यापक शब्दानुभव**

नव्याने वाचायला शिकत असलेल्या मुलाच्या दीर्घकालीन स्मृतिकोशात असलेला शब्दसंग्रह जर खूपच मर्यादित असेल तर ही, वाचलेल्या मजकुराच्या आकलनाची प्रक्रियाही मर्यादितच असते. उलट हा शब्दसंग्रह मोठा आणि विविधांगी असेल तर वाचनप्रक्रियाही – त्यातील आकलनाचे उद्दिष्ट साध्य केलेली अशी प्रभावी होते. मानसशब्दकोशातील प्रतिमांकित शब्दसंग्रह वाढत जाणे हे सर्वस्वी त्यासाठी मिळणाऱ्या विविधांगी अनुभवांच्या संधींवर अवलंबून असते.

आणखीही एक पूर्वतयारी मानसकोशात झालेली असते. ती म्हणजे भाषाविषयक

माहिती, भाषेची धाटणी, भाषेचे व्याकरण, शैली आणि भाषेत असणाऱ्या विशिष्ट अशा सांस्कृतिक वातावरणातून येणाऱ्या शब्दच्छटा, म्हणी, वाक्प्रचार इत्यादी गोष्टी. या साऱ्यांचे मनात साठवलेले संदर्भ घेऊनच आपण वाचलेली किंवा बोललेली भाषा पूर्णतेने आकलन करून घेतो.

चांगल्या वाचकाच्या बाबतीत या साऱ्या प्रक्रिया अत्यंत वेगाने म्हणजे अत्यंत अल्पावधीत घडून येतात. केवळ पाव सेकंदात म्हणजे २५० मिली सेकंदांत, सर्वच म्हणजे, भाषिक, दृष्टिगोचर मजकूर आणि वाचलेल्या मजकुरातील माहितीचे त्याच्या सारांशात केलेले संघटन त्या घडवून आणत असतात. मानसशास्त्रज्ञ ही बौद्धिक कामगिरी महत्त्वाची मानतात. यात ऊर्ध्वगामी (खालून वर अशी) म्हणजे अक्षर ओळखण्यापासून ते परिपूर्ण आकलनापर्यंत जाणारी प्रक्रिया असते. दुसरीही, म्हणजे अधोगामी (वरून खाली जाणारी) शब्दाच्या आकलनाकडून अक्षरओळखीकडे जाणारी प्रक्रियाही अस्तित्वात असते, या प्रक्रियेला 'शब्द-वर्चस्व परिणाम' (वर्ड सुपिरिऑरिटि इफेक्ट) असे म्हणतात. केलेल्या प्रयोगांतून संशोधकांना असे आढळून आले की, आपली अक्षर-ओळख ही तिला निरर्थक शब्दांपेक्षा एखाद्या अर्थपूर्ण शब्दात स्थान मिळाल्यामुळे अधिक होते. उदाहरणार्थ, 'सकाळ'मधील 'ळ' चटकन ज्ञात होतो; पण तसा तो 'कसाळ'मधून होणार नाही. याचे कारण असे की वाचकाची अर्थपूर्ण शब्दांशी अधिक जवळीक असते. त्यामुळे या वरच्या स्तरावरील शब्दार्थाकडून खालच्या स्तरावरील अक्षर ओळखीकडे जाणे वाचकाला सहज जमते.

वाचन ही एकूण कठीण आणि गुंतागुंतीची क्रिया आहे. ती एकाच वेळी अनेक स्तरांवरील काम वाचकाकडून अपेक्षित करते. तसेच या विविध स्तरांवरील क्रियाही परस्परसंबंधित आणि वेगाने घडणाऱ्या अशा असतात. मुलांना त्या चांगल्या तऱ्हेने आत्मसात व्हायला हव्या असतील तर त्या त्यांना एकदमच शिकाव्या लागतात. त्यांना 'निरर्थक' अक्षरांकडून 'अर्थपूर्ण' शब्दांकडे – खालून वर – असे नेण्यापेक्षा शब्दांकडून, अर्थपूर्ण शब्दांच्या ओळखीकडे आणि मग पुढे त्याचे घटक असलेल्या स्वतंत्र अक्षरांपर्यंत सहजतेने पोचता येते.

वाचता येणे, चांगले वाचता येणे यासाठी सांस्कृतिक वातावरणातून येणारा विविधांगी भाषानुभव साचत जाणे फार महत्त्वाचे असते, कारण त्याने स्मृतिकोशातील शब्दसंग्रह वाढत जातो.

हे सिद्ध करणारे काही अभ्यास प्रसिद्ध झाले आहेत. एका संशोधन गटाने पहिली ते चौथीच्या मुलांचा सतत चार वर्षे अभ्यास केला. मुले वाचनकौशल्य कोणकोणत्या पायऱ्यांनी आत्मसात करतात, तसेच शब्दओळख चांगली असेल तर वाचन सुधारते

का यांचा शोध घेणे, हा या अभ्यासाचा हेतू होता. अभ्यासाचा निष्कर्ष असा की प्रत्यक्ष शाळांतील सुरुवातीच्या इयत्तांमधून मुलांना वाचन नेमकेपणाने नि बऱ्यापैकी वेगाने करता येऊ लागले तर चौथीच्या पातळीवर वाचनाचे आकलन खूप चांगले होते. पहिलीतील वाचन-वेगावरून चौथीतील आशय-आकलन-कौशल्याचा अंदाज करता येतो.

आपल्या शालेय शिक्षणाचा अनुभव असा आहे, की अगदी चौथीमधील असंख्य मुलांना वाचन सहजतेने करता येत नाही किंवा कित्येकदा वाचताही येत नाही. त्यातून होणारी आकलनाची बाब तर दूरच. मग हा प्रश्न कसा सोडवायचा ? आकलनशास्त्रात या दिशेने बराच विचार झाला आहे.

मुलांना वाचता येणे, चांगले वाचता येणे याचा संबंध दोन गोष्टींशी आहे : एक आहे बाह्य गोष्ट म्हणजे विद्यार्थी काय वाचतो आणि त्याची वाचन शिकण्याची पद्धत कोणती आहे ही. मुलांसमोर जे वाचनखाद्य म्हणून सुरुवातीस (बहुधा क्रमिक पुस्तकाच्या रूपाने) पुढे ठेवले जाते, त्याचा संबंध त्याच्या दैनंदिन भावजीवनाशी असावा लागतो. त्यामुळे क्रमिक पुस्तक हे भाषेच्या अंगाने तयार न करता ते भावजीवनातील ओळखीच्या गोष्टींपासून असावे लागले. त्यामुळे अर्थातच संपूर्ण राज्यभर एकच क्रमिक पुस्तक ही संकल्पना टाकून द्यावी लागेल. दुसरे असे की, त्यातील मजकूर हा कोरडा – 'कमल नमन कर', 'गणपत नमन कर' असा असून चालणार नाही; तो रसपूर्ण असावा लागेल. मुलांना आवडणाऱ्या इसापच्या गोष्टींचा वापरही करायला हरकत नाही. बालवाडीत माहीत झालेल्या नि आवडलेल्या गोष्टींच्या आधारेही मुलांना वाचनाकडे वळवता येईल. लहान मुलांच्या बाबतीत कल्पकता, म्हणजे कल्पनेच्या भराऱ्या मारणे ही गोष्ट नैसर्गिक आणि सहजसाध्य अशी असते. एखादी ऐकलेली गोष्टसुद्धा मुले आपल्या कल्पनांचे रंग घालून बदलून टाकतात. कल्पकता ही भावी काळातील बौद्धिक कार्याचा पाया म्हणूनही महत्त्वाची असते. त्यामुळे मुलांच्या वाचनाची सुरुवात करताना त्यांना कल्पना लढवायला सांगून त्यातील निवडक शब्दांपासूनही सुरुवात करता येते.

वाचन शिकताना वा करताना, मुले जे शब्द वाचतात, जी वाक्ये वाचतात ती त्यांच्या दीर्घकालीन स्मृतिकोशातील मानसशब्दसंग्रहाशी ताडून वा जोडून पाहतात आणि ही प्रक्रियाच त्यांना आशयाचे आकलन करून देत असते. अशावेळी हा शब्दसंग्रह भक्कमपणे तयार झालेला असावा लागतो. साधारणपणे पहिलीतील मुलगी ५००० पर्यंतचे शब्द समजू शकते. तिच्या मानसशब्दकोशात हे शब्द लिहिलेले असू शकतात. रोज सुमारे ११ नव्या शब्दांची भर या शब्दकोशात पडत जाते. अशाप्रकारे

कॉलेजच्या वयापर्यंत सुमारे ५०,००० शब्दांची बेगमी झालेली असते. साधारणपणे या गणिताचा आधार घेऊन मुलांचा मानसशब्दकोश समृद्ध करीत जाणे हे केवळ वाचनकौशल्यासाठीच नव्हे तर पुढील काळातील उच्च ज्ञानाच्या तयारीसाठीही उपयुक्त असते.

अर्थात मानसशब्दसंग्रह विकसित करणे म्हणजे शब्दकोश घेऊन शब्दार्थ पाठ करणे नव्हे, हे आवर्जून सांगितले पाहिजे, की शब्द पाठ करवून घेऊन मुलांचा शब्दसंग्रह वाढवायचा नसतो, तसा तो मानसपातळीवर कायमस्वरूपी वाढतही नसतो. नाहीतर, शब्दसंग्रह वाढवणे महत्त्वाचे आहे असे कळले, की उत्साही पालक आणि त्यांना साथ देणारे, संस्कारांची दुकाने थाटणारे लोक मुलांच्या मागे लागून त्यांच्याकडून श्लोकांप्रमाणे विविध भाषांतील शब्द पाठ करवून घेतील. शब्द भाषेतील असले तरी त्यांचे अर्थ, भाव हे सारे मुले आपल्या आजुबाजूच्या वातावरणातून आणि आपल्या अनुभवांकरवी उचलीत असतात. आपले काम असते ते मुलांना अशाप्रकारचे वातावरण पुरविण्याचे आणि अशाप्रकारच्या शब्दानुभवांच्या संधी पुरविण्याचे. शब्दार्थांशी एकरूप होऊनच मुले आपला मानसशब्दसंग्रह वाढवीत असतात. मूर्त वस्तू-व्यक्तींच्या व घटनांच्या संदर्भातील शब्दांकडून शब्दानुभवांत सहभागी होत होतच मुले आपली आपण अमूर्त पातळीवरील शब्दांकडे पोचत असतात.

मुलांचा मानसशब्दकोश समृद्ध करण्यासाठी भोवतालच्या जगातील विविध तऱ्हेचे अनुभव देणारे उपक्रम शाळा आखू शकतात. या अनुभवांचे, एकूण अनुभवविश्व व्यापक करण्याचे महत्त्व आहेच; परंतु त्यांचा आणखी एक उपयोग भाषिक अंगाने करता येतो. जेवढे अनुभवविश्व व्यापक होते तेवढ्या भाषाविकासाच्या संधी अधिक असतात; आणि जेवढे अनुभवविश्व विविधांगी असते तेवढे भाषेचे विविधांगी पैलू विकसित होत जातात. विशिष्ट उपक्रमात येणाऱ्या शब्दांचा एकत्रित संग्रह, केवळ अनुभवविरहीत सुट्या शब्दांपेक्षा मुलांच्या मनात अधिक ठसतो. तो त्यांच्या दीर्घकालीन स्मृतिकोशात जाऊन बसतो.

आपल्या दैनंदिन शिक्षणव्यवहारात, वाचनकौशल्य अवगत करणे कुणाला सहज सोपे आणि कुणाला कठीण जाते याचे नुसते अवलोकन केले तरी लक्षात येईल की ज्यांना कौटुंबिक स्तरावर, शालेय स्तरावर, वाचनपूर्व कालात, शब्दानुभवाच्या अधिक संधी मिळालेल्या असतात, अशी मुले वाचायला सहजपणे शिकतात. परंतु अशा अनुभवांना पारखी असलेली मुले, तेवढीच बुद्धिमान असूनही वाचनाशी सलगी करण्यात कमी पडतात. हे केवळ वाचायला शिकण्यापुरते खरे नाही तर पुढील उच्च पातळीवर, म्हणजे सहजवाचन कौशल्याच्या स्तरावरही तेवढेच खरे आहे.

वाचता येणे, चांगले वाचता येणे हे संगणकयुगातही मानवी समृद्धीचे पायाभूत अंग आहे. आपण पुस्तक वाचतो, त्याच हेतूने संगणक वापरायचा असेल तर संगणकही वाचावा लागतो. ज्ञान आत्मसात करण्याचा एक प्रभावी मार्ग म्हणून सहजवाचन प्रक्रियेचे आणि त्याकरवी प्रत्यक्ष वाचनाचे महत्त्व अनिवार्य आहे. ·

(या लेखातील सर्व संशोधनविषयक व सैद्धांतिक उल्लेख, हे जॉन टी. ब्रुअर यांच्या 'स्कूल्स फॉर थॉट' या ग्रंथातील 'रीडिंग' या प्रकरणातील आहेत.) ■

1452, रविवार पेठ, वाई, जि. सातारा 412 803.
**भ्रमणभाष** : 98812 30869

**शालेय**

मराठीत 'शालेय' शब्दही असाच गमतीचा आहे. शालेय या शब्दाचा मराठी अर्थ 'विद्यालयासंबंधी', 'विद्यालयाचे' असा आहे. परंतु दाते यांच्या मराठी कोशात हा शब्द या अर्थी नाही. संस्कृतमध्ये 'शालेय' शब्दांचा अर्थ 'साळीसंबंधी' असा आहे. साळीपासून तांदूळ काढतात हेही काहींना माहीत नसेल. हिंदीमध्ये या शब्दाचे बडीशेप, मुळा, साळीचे शेत, सालवृक्षासंबंधी इ० अर्थ आहेत. मराठीमध्ये मात्र शालेय शिक्षण म्हटले जाते. संस्कृतमधील पाठशाला या पदातील केवळ 'शाला' शब्द घेऊन त्याचे शालेय रूप मराठीने केले. शालाचा अपभ्रंश झाला शाळा. संस्कृतमध्ये 'शाला' शब्द स्थान या अर्थी येतो. पाठशाला, अश्वशाला, गोशाला इत्यादी. मराठीमध्ये अशाप्रकारे शाला शब्दाचा अर्थसंकोच झाला आहे, त्याला विशेष अर्थ प्राप्त झाला आहे. हिंदीमध्ये पाठशाला असाच प्रयोग केला जातो. शालेय शब्द मराठीच्या दृष्टीने जरी रूढ झाला असला तरी अन्यभाषिक जेव्हा मराठी शिकण्याचा प्रयत्न करतात तेव्हा त्यांना फार अडचणी येतात. पेशव्यांच्या काळी नाचणाऱ्या बायकांना 'नाटकशाळा' म्हणत हेही विचित्र आहे. नाटकशाळेत राहणाऱ्या असा त्याचा अर्थ असावा.

**– प्रा० दिनकर खंडेराव देशपांडे**
'मैत्रीच्या पलीकडे', जुलै-ऑक्टोबर २००३, पृ. १९

# 'पण'ची श्रीमंती

उज्ज्वला जोगळेकर

**१. प्रस्तावना**

उभयान्वयी अव्ययांचा युरोपात व विशेषत: फ्रेंच भाषक अभ्यासकांत 'argumentative connectors' म्हणजे 'रोखदर्शक अन्वयी शब्द - ''रोखान्वयी अव्यये'' अशी शब्दयोजना करत आहे - या दृष्टिकोणातून पुष्कळ सखोल विचार झाला आहे. या सर्व अभ्यासाला भाषिक तत्त्वज्ञानाची बैठकही आहे. प्रस्तुत लेखात त्या कशाचाच ऊहापोह न करता एका जादुई रोखान्वयी अव्ययाची करामत तेवढी मराठी भाषकांसाठी मांडणार आहे. ते रोखान्वयी अव्यय म्हणजे "mais" – उच्चार ''मे''. बहुतेकवेळा भाषांतरपण या एका शब्दावर विपुल लेखन झाले आहे. त्याच्या अनुषंगाने मराठीतील 'पण'चा विचार करता येईल.

मराठीत या उभयान्वयी अव्ययाची बोळवण न्यूनत्वबोधक आणि विरोधदर्शक अशी होते. मो. रा. वाळंबे यांनी दिलेले 'पण' चे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे :

< शेतकऱ्यांनी शेते नांगरली पण पाऊस पडलाच नाही. >

'' 'पण' हे अव्यय पहिल्या वाक्यात काही उणीव. दोष, कमीपणा असल्याचे सुचविते. अशा अव्ययांना न्यूनत्वबोधक उभयान्वयी अव्यय म्हणतात. (न्यूनत्व = कमीपणा). ही अव्यये दोन वाक्यांतील विरोध दर्शवतात; म्हणून यांना विरोधदर्शक असेही म्हणतात. (वाळंबे, मो. रा. १९७४ : ८०)

या पार्श्वभूमीवर आता फ्रेंच "mais" - ''मे'' - बाबतचे विवेचन पाहू. प्रस्तुत लेखात जेथे जेथे या शब्दाचे भाषांतर मराठीत 'पण' असे होते; तेच उपयोग विचारात घेतले आहेत.

१.१ 'पण' आणि आर्ग्युमांतास्यॉं दॉं ला लॉंग हा सिद्धांत (आंस्कॉंब्र व द्युक्रो, १९८३ : ८)

जॉ-क्लोद आंस्कॉब्र व ओसवाल्ड द्युक्रो या द्वयीने 'आर्ग्युमांतास्यॉं दॉं ला लॉंग' (Argumentation dans la Langue) म्हणजे ''भाषेतील रोखदर्शकता'' हा सिद्धांत विकसित केला. चिन्हदर्शन किंवा संदर्भसूचकता हा भाषाशास्त्राला न

उकलणाऱ्या अर्थविचाराचा प्रांत किंवा अर्थविज्ञानाला पूरक अशी एक मिती ह्या दृष्टीने त्याच्याकडे न पाहता अर्थविज्ञानात संदर्भसूचन अनुस्यूत असते, संदर्भानुरूपच शब्द, वाक्य योजना ठरत असते; ही त्यांच्या सर्वच विवेचनाची तात्त्विक बैठक आहे. वाक्यापलीकडे जाऊन संदेशप्रबंधाच्या पातळीवर विचार करताना वाक्य-जोडणी ही ''एक विधान (वा विधानसमूह) दुसरे विधान (वा विधानसमूह) ग्राह्य होण्यासाठी मांडणे म्हणजेच ''भाषेतील रोखदर्शकता''. बहुतेकवेळा दोन विधानांतील हा संबंध ''रोखान्वयी अव्यये'' प्रकट करतात.

'पण'चा उपयोग वाक्यांतर्गत आणि दोन वाक्यांना जोडण्यासाठी असा दोन्ही पातळ्यांवर होतो :

(१) तो एक हुशार, पण आळशी मुलगा आहे.

(२) तो हुशार आहे; पण आळशीपणा करतो.

'पण'च्या विरोधदर्शकत्वाचे वैशिष्ट्य असे, की त्यानंतर येणारा वाक्यांश हा वरचढ मुद्दा बनतो. (द्युक्रो, ओसवाल १९७९ : ११-६०) त्यामुळे वरील उदाहरणात वाक्यांशांचा क्रम बदलला तर अगदी विरुद्ध परिणाम साधतो :

(३) तो एक आळशी; पण हुशार मुलगा आहे.

(४) तो आळशीपणा करतो; पण हुशार आहे.

पहिल्या २ वाक्यांनंतर < म्हणून आपण त्याला हे काम देऊ > असे विधान करता येणार नाही. याउलट वाक्य क्र. ३ वा ४ नंतर < म्हणून आपण त्याला एक संधी देऊ > असे विधान मान्य होऊ शकेल. आता पुढील उदाहरणे पाहा :

(५) आज शाळेला सुटी आहे; पण मी जाणार आहे. कारण आमच्या नाटकाची तालीम आहे.

(६) आज शाळेला सुटी आहे; पण आमच्या नाटकाची तालीम आहे म्हणून मी जाणार आहे.

शाळेला सुटी असणे हा मुद्दा शाळेत न जाण्याचा निष्कर्ष ग्राह्य धरतो, तर नाटकाची तालीम हा शाळेत जाण्याचे समर्थन करणारा मुद्दा आधीचा निष्कर्ष अग्राह्य ठरवतो.

विधानांतील रोखदर्शकता व्यक्त करण्यासाठी $p$, $q$ व $r$ आणि या $-$ $r$ चार चिन्हांचा वापर केला जातो. $p \rightarrow r$ म्हणजे $p$ द्वारे $r$ हा निष्कर्ष निघतो. $q - r$ म्हणजे $q$ द्वारे $- r$ (= $r$ काही) हा निष्कर्ष निघतो. ( $p$ पण $r$ नाही; कारण $q$ ) - उदाहरण क्र. ५, तसेच ($p$ पण $q$ म्हणून $r$ नाही) उदाहरण क्र ६ असे दोन प्रकारचे विरोधदर्शन *पण* ने व्यक्त होते. A, B, C इ० चिन्हे विशिष्ट

वाक्यांशदर्शक व त्यामागील रोखदर्शकता दाखवण्यासाठी $p$, $q$ व $r$ आणि $-r$ ही चिन्हे असाही काटेकोर भेद अनेकदा केलेला आढळतो.

*ले मो द्यू दिसकूर (Les mots du discours)* (द्युक्रो व इतर १९८० : ९३ - १३०) या पुस्तकातील (द्युको व इतर १९८० : ९९) (ओक्यूप - त्वा दामेली) 'अमेलीची काळजी घे' या नाटकात आढळून आलेले *में* चे बहुतेक सर्व उपयोग *पण*ने व्यक्त होतात. येथे $P$ व $Q$ मोठ्या टाइपमधे लिहिले आहेत आणि ते विशिष्ट वाक्यांश व त्यामागील रोखदर्शकता या दोन्हीचा निर्देश करतात. नाटक या वाङ्मय प्रकारात $P$ पण $Q$ हे दोन्ही मुद्दे एकाच वक्त्याच्या तोंडी असू शकतात किंवा $P$ या मुद्याला पण $Q$ हा प्रतिमुद्दा दुसऱ्या वक्त्याच्या तोंडी असू शकतो. वक्त्यांसाठी 'जगन' आणि 'छगन' ही नावे घेतली आहेत.

(I) पण हा वक्त्याने दिलेल्या उत्तराचा भाग असणे.

जगन : $P$ पण $Q$.

(७) मी येईन, पण हे शेवटचं.

(II) *पण* ने उत्तराची सुरुवात होणे, आणि त्यानंतर $Q$ ची मांडणी असणे :

जगन : पण $Q$ – याचे तीन पोटभेद आहेत.

(अ) पण हे *य* या वक्त्याच्या $P$ या विधानाला विरोधदर्शक उत्तर $Q$ देण्यासाठी येते.

छगन : $P$

जगन : पण $Q$ हा विरोध तीन प्रकारचा असू शकतो :

(१) छगन ने $P$ म्हणण्यालाच.

(२) छगनने $P$ वरून काढलेल्या निष्कर्षाला (मात्र जगन ला $P$ ची सत्यता मान्य असते).

(३) $P$ च्या सत्यतेला.

हे तीनही प्रकारचे विरोध एकाच विधानाच्या संदर्भात पाहू :

(८) छगन : बाईसाहेब बाहेर गेल्यात.

जगन : (१) पण तू हे मला का सांगतोयस ?

(२) पण मला पुष्कळ वेळ आहे. थांबतो मी त्या येईपर्यंत.

(३) पण मी आताच तर फोनवर बोललो त्यांच्याशी ![१]

---

१. अर्थातच हे दूरध्वनीच्या संदर्भात, भ्रमणध्वनीच्या नव्हे.





अनुक्रमणिका

(ब) पण हे एखाद्या कृत्याला क्ष चा विरोध दर्शवते :

जगन : पण $Q$ – हा विरोध

(अ)य च्या वागण्याला (पण Q हे य ला उद्देशून);

(९) << पण सांगितलंय कोणी नसते उद्योग करायला ! >>

येथे *तुला* हा शब्द 'कोणी'नंतर अनुस्यूत आहे.

(आ) एखाद्या परिस्थितीला :

वरील वाक्य क्र. ९ दुसऱ्याच एखाद्याच्या वागण्यावरची प्रतिक्रिया असू शकते.

(III) *पण*ने उत्तराची सुरुवात होणे, आणि त्यानंतर Qची मांडणी नसणे :

(१०) छगन : उद्या दुपारच्या आत रिपोर्ट तयार हवा.

जगन : पण ...

**१.२ आना राझगुलिआएव्हा (राझगुलिआएव्हा, आना २००४ : २१५-२४१) यांची मांडणी**

आना राझगुलिआएव्हा यांच्या मते विधानार्थ, आज्ञार्थ आणि प्रश्नार्थ या तीन प्रकारच्या उक्तींवरची *पण* ने दिलेली प्रतिक्रिया ही वक्त्याच्या विभिन्न हेतूंवरील प्रतिक्रिया असते. *पण* ने व्यक्त झालेला विरोध हा त्या गर्भित हेतूला असतो.

आना राझगुलिआएव्हा यांनी दाखवून दिलेल्या maisच्या उपयोगांपैकी मराठीत पण ने व्यक्त होणारे उपयोग तेवढेच नमूद करत आहे.

(अ) *पण* ने विधानार्थी उद्गारावरील प्रतिक्रिया
(राझगुलिआएव्हा, आना २००४ : २२०-२२८)

या प्रतिक्रिया पुढील बाबींवर आक्षेप नोंदवतात :

( i ) विधानातील आशयाची सत्यता

( ii) वक्त्याचा सच्चेपणा

(iii) विधानातून निघू शकणारे अर्थ

(iv) विधानाचे प्रयोजन.

( i ) **विधानातील आशयाच्या सत्यतेवर आक्षेप घेणारी प्रतिक्रिया**

यात दोन पोटभेद आहेत. पहिला विधानातील गर्भित अर्थावर आक्षेप – पुढील उदाहरण क्र. ११ पहा :

(११) जगन : आता चंदू सिगरेट ओढत नाही.

छगन : पण तो तर कधीच ओढत नव्हता.

'आता' सिगरेट ओढत नाही म्हणजे 'आधी' ओढे असे ध्वनित होते. या गर्भित अर्थावर आक्षेप नोंदवताना *पण* हे रोखान्वयी अव्यय वापरले जाते.

दुसरा पोटभेद म्हणजे 'विधानाला खोटं न ठरवता त्याच्या सत्यतेबाबत शंका उपस्थित करणे' (उदाहरण क्र. १२, १३),

(१२) जगन : परेश परीक्षेत नापास झाला.

छगन : पण मला तर म्हणाला पास झालो (म्हणून)!

(१३) जगन : परेश परीक्षेत नापास झाला.

छगन : पण पठ्ठा (तर) मजेत दिसला !

उदाहरण क्र. १२ व १३ या प्रतिक्रियांचं वैशिष्ट्य असं की << (जगन)ची नवीन प्रतिक्रिया येण्यापूर्वी विधानाची सत्यता तसेच सदर विधान ग्राह्य धरण्यास वाव आहे हा निष्कर्ष ''राखून ठेवलेले असतात.'' ही दोन्ही विधाने एकाच स्थलकाल अवकाशात खरीही असतात आणि खोटीही असतात.>> (राझगुलिआएव्हा, आना २००४ : २२४)

मराठीत *पण* च्या बरोबरीने *तर* ही वापरले जाते. त्याने आधीच्या शब्दावर भर देण्याचे कार्य होते - १२ मधे माहितीच्या स्रोतावर आणि १३ मधे वक्त्याच्या दृष्टिकोणावर.

(ii) **वक्त्याच्या सच्चेपणावर आक्षेप घेणारी प्रतिक्रिया**

*पण* ने व्यक्त होणारा हा उपयोग << वक्त्याने या पूर्वी केलेल्या नेमक्या विरोधी विधानाचा उल्लेख करणे >> (राझगुलिआएव्हा, आना २००४ : २२५) ही छटा दर्शवते.

(१४) जगन : बरोबर आहे तुझं. विलास हुशार आहे.

छगन : पण तू तर नेहमी याच्या उलट म्हणायचास !

या उपयोगाचे वैशिष्ट्य असे की << वक्त्याच्या विधानाच्या सत्यतेला आक्षेप नसतो तर ते ज्याने व्यक्त केले त्याने त्याचा उच्चार करण्यावर असतो; कारण या संवादकर्त्याच्या सच्चेपणावर विश्वास ठेवायला वाव आहे असा संकेत त्याला मिळालेला नसतो. >> (राझगुलिआएव्हा, आना २००४ : २२६) येथे *तर* या क्रियाविशेषण अव्ययाचा उपयोग केवळ त्याच्या आधीच्या शब्दावर भर देणे एवढाच असला तरी तो शब्द संवादकर्त्याचा निर्देश करत असल्याने आपोआपच त्याच्या सच्चेपणावर आक्षेप घेतला जातो.



अनुक्रमणिका

(iii) **विधानातून निघू शकणाऱ्या अर्थाला आक्षेप**

उदाहरण क्र. १५ मधील दोन पालकांचा दृष्टिकोण पाहा :

(१५) जगन : मी मुलांना सुट्टीत छंदवर्गात घालणार आहे.
छगन : पण सुट्टीत वेळेचं बंधन हवं कशाला ?

या ठिकाणी *पण* ने दिलेल्या उत्तराने विधानाच्या सत्यतेला आक्षेप घेतलेला नसून तो आक्षेप त्यातून निघू शकणाऱ्या निष्कर्षाला आहे.

(iv) **विधानाचे प्रयोजन निकालात काढणे**

जर एखाद्या विधानावरील प्रतिक्रिया, त्याने पुरवलेली माहिती श्रोत्यासाठी निरुपयोगी आहे असे दर्शवत असेल तर त्या विधानाचे प्रयोजनच उरत नाही.

(१६) जगन : मंगळवारचा तास रद्द झालाय.
छगन : पण मी तर त्याला कधीच जात नाही.

(आ) *पण* ने *आज्ञार्थी उद्गारावरील प्रतिक्रिया* (राझगुलिआएव्हा, आना २००४ २२९ - २३६)

( v ) कृती करण्याच्या शक्यतेला आक्षेप
( vi ) कृती करण्याच्या आवश्यकतेला आक्षेप
( vii) संवादकर्त्याने सूचना करण्याला आक्षेप
(viii) सूचनेच्या सयुक्तिकतेला आक्षेप असे ४ प्रकारचे आक्षेप *पण* ने नोंदवले जातात.

( v ) **कृती करण्याच्या शक्यतेला आक्षेप**

(१७) जगन : मला अजून खाऊ हवा.
छगन : पण खाऊ तर संपला !

वरील उदाहरणात रूढार्थाने आज्ञार्थी विधान नसले तरी त्याचा मथितार्थ मागणी हाच आहे, प्रतिक्रिया त्या मागणीच्या पूर्ततेच्या संदर्भातच आहे.

(vi) **कृती करण्याच्या आवश्यकतेला आक्षेप**

(१८) जगन : रेडिओ लाव. मला बातम्या ऐकायच्यात.
छगन : पण बातम्यांची वेळ (तर) होऊन गेली !

(vii) **संवादकर्त्याने सूचना करण्याला आक्षेप**

या प्रकारात *पण* चा उपयोग वैकल्पिक आहे.

(१९) जगन : तुझी खोली आवरून ठेव.
छगन : (पण) तू कोण मला सांगणार ?

(viii) **सूचनेच्या सयुक्तिकतेला आक्षेप**

(२०) जगन : तुझी खोली आवरून ठेव.
छगन : पण ती तर मी मगाशीच आवरली !

वरील उपयोगांखेरीज *पण* चा आणखी एक आज्ञार्थी वाक्यातील उपयोग आहे. मात्र त्याचे स्वरूप एखाद्या विधानाची प्रतिक्रिया असे नसते, तर तो वक्त्याच्या स्वतंत्र वक्तव्याचा भाग असतो. त्याचा संबंध एखाद्या घटनेशी वा कोणाच्या वर्तणुकीशी असू शकतो. उदाहरण क्र. २१ मधे *पण* च्या आधी येणारा वाक्यांशही आज्ञार्थी असल्याने ते विरोधी नव्हे तर पूरक रोख व्यक्त करतो.

(२१) काहीही करा, पण सोडवा त्यांना !

वरील वाक्य फ्रेंचमधे व्यक्त होताना *पण* नव्हे, तर *आणि* या अन्वयाचा वापर अनिवार्य ठरतो. मराठीतही *आणि* चा वापर ग्राह्य ठरू शकेल; कारण पहिल्या कृतीची परिणामस्वरूप दुसरी कृती अपेक्षित आहे, त्यात कालानुक्रम अभिप्रेत आहे.

उदाहरण क्र. २२ ही म्हण आहे. ती सहसा प्रतिक्रियात्मक असते, उत्तर किंवा पाठिंबा दर्शवण्यासाठी हे उद्गार काढले जातात.

(२२) पादा पण नांदा !

(इ) *पण ने प्रश्नार्थ उद्गारावरील प्रतिक्रिया*
(राझगुलिआएव्हा, आना २००४ : २३६-२४०)

मराठीत प्रश्नार्थ उद्गारावरील दोन प्रतिक्रिया *पण* ने व्यक्त होतात. त्या अनुक्रमे

(ix) उत्तर देण्याच्या बंधनाला विरोध

(x) प्रश्नाच्या गर्भित अर्थावर आक्षेप ह्या होत.

(ix) **उत्तर देण्याच्या बंधनाला विरोध**

(२३) जगन : तू उद्या काय करणार आहेस ?
छगन : पण (त्याच्याशी) तुला काय करायचंय ?

(x) **प्रश्नाच्या गर्भित अर्थावर आक्षेप**

(२४) जगन : माझ्याबरोबर आता स्टेशनपर्यंत कोण येतंय ?
छगन : पण आपण सगळेच चाललोय म्हटलं.

अशा प्रकारे *पण* ह्या रोखान्वयी अव्ययाचे मराठीतही विविध उपयोग आहेत.

**संदर्भ :**

आंस्कॉब्र, जॉ-क्लोद, द्युक्रो, ओसवाल्ड (१९८३) *लार्ग्युमांतास्यॉं दॉ ला लॉग.* ल्येज प्रकाशन, मार्दागा. (L'Argumentation dans la langue, Liege, Mardaga.)

द्युक्रो, ओसवाल्ड (१९७९) << *आनालीज प्राग्मातिक* >> कोम्युनिकास्यॉं क्र. ३२ (<<Analyse pragmatique >> Communication n$^{0}$32) पृ. ११-६०.

ब्र्यूसेल व इतर --, ओसवाल्ड द्यूक्रो व इतर (१९८०), *ले. मो द्यू दिसकूर* (Les mots du discours) प्र ३, << *मे* ओक्यूप - त्वा दामेली >> (<<mais Occupe-toi d'Amelie >>) पृ. ९३-१३०.

राझगुलिआएव्हा, आना (२००४) रोसारी, कोरीन (सं). *ओतूर दे कोनेक्तर* (Autour des connecteures) प्र. ६वे, पृ. २१५-२४१.

वाळंबे, मो. रा. (१९७४), सुगम मराठी व्याकरण लेखन, गो. य. राणे प्रकाशन, पुणे. ■

22, **मनीषा सोसायटी, कर्वेनगर, पुणे** 411 052.
**भ्रमणभाष** : 94031 85526

**नवरा-नवरी-बायको**

तरुणतरुणींचा विवाह होताना त्यांना वेगळ्या संज्ञा असतात आणि विवाहोत्तर वेगळ्या. वरवधू या मूळ संस्कृत संज्ञा आता हिंदी, मराठीमध्येही प्रचलित आहेत. संस्कृतमधील वरवधू विवाहानंतर पतिपत्नी होतात. उच्चस्तरीय हिंदी मराठीत हेच शब्द येतात. उर्दूमध्ये दुल्हा-दुलहन शादीनंतर मियाँबीबी किंवा शौहरबीबी होतात. इंग्रजीमध्ये ब्राइडग्रूम आणि ब्राइड मॅरेजनंतर हजबंड व वाइफ होतात. पण मराठी नवरा-नवरी लग्नानंतर नवरा व बायको होतात; म्हणजे नवरी बायको म्हणवली जाते. पण नवरा नवराच राहतो हे कसे ? मी बदलणार नाही असं मराठी नवऱ्यानं ठरवलेलंच दिसतं. यामागचं मानसशास्त्र किंवा सामाजिक जाणिवांचा विचार होणे गरजेचे आहे.

— **प्रा० दिनकर खंडेराव देशपांडे**
'मैत्रीच्या पलीकडे', जुलै-ऑक्टोबर २००३, पृ. २०



अनुक्रमणिका

# कातकरी बोली

शंकर सखाराम

आदिवासी मूलतः वनवासी. त्यांच्या अनेक जमाती आहेत. त्या जमातींपैकी कातकरी ही एक आदिवासी जमात आहे. खैराच्या झाडापासून पूर्वी हे लोक कात तयार करीत असत म्हणून त्यांना कात करणारे ते कातकरी असे नाव पडले. त्यांना काथोडी, कातोडी, काठोडी, काथोडिया, काथोरी असेही म्हणतात.

वि.का. राजवाड्यांच्या मते कातकरी हे महाराष्ट्रातील आद्य रहिवासी होत. कृत्ती म्हणजे कातडे व पट्टिन म्हणजे ते वापरणारा, यावरून कृत्तिपट्टिन या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश होऊन कातवडी - कातकरी हे नाव पडले.

रामाच्या वानरसेनेपासून आपली उत्पत्ती झाली असे काही कातकरी सांगतात. मात्र कातकरी लोक पूर्वीपासून खैराच्या लाकडापासून रानात कात बनवून तो नगरात विकत होते हे सत्य आहे. तेथूनच त्यांना कातकरी हे नाव पडले.

ह्या कातकऱ्यांत सोन कातकरी व ढोर कातकरी असे दोन प्रकार होते. सोन कातकरी स्वत:ला उच्च समजत. त्यांची वस्ती कुलाबा (आजचा रायगड), रत्नागिरी जिल्ह्यांत होती, आज असे भेद कातकऱ्यांत उरलेले नाहीत. पूर्वीपासून कातकऱ्यांची जास्त वस्ती रायगड जिल्ह्यात आहे.

कातकरी मुळात वन्यजमात. रानावनात भटकून शिकार, कंदमुळांवर पोट भरणारे हे लोक. वन त्यांचे मुख्यालय. रानातील लाकूडफाटा, रानभाजीपाला, मध, केलेली शिकार विकून व इकडे तिकडे मोल-मजुरी करून हे लोक आपला उदरनिर्वाह करतात. काहीजण 'दळा' पेरून त्यातून वरी, नागली, कांग यांची पिके घेतात. रानानजीकच्या वाहत्या नदीकिनारीच्या टेकडीवर ह्या लोकांची वस्ती असते.

अशा ह्या कातकरी लोकांची बोली ती 'कातकरी बोली.' ही महाराष्ट्राची आद्य बोली.

काही कातकरी लोक परात उपडी घालून तीवर मेणाने लांब काडी उभी चिकटवतात व तीस मेण चोळून त्यावरून हात फिरवून परातीतून कंपन ध्वनी निर्माण करतात. त्यास 'सुरत' म्हणतात. ह्या 'सुरत' वर ते कातकरी बोलीतून धार्मिक,

पौराणिक कथा सांगतात.

एक दीस काय हिना, राम वनामा ग्या;

राम वनामा ग्या, व - व - व ऽ ऽ ऽ

राम वनामा ग्या, त्या संगं कोन कोन ह्यता ? त्या संगं सीता ह्यती, लक्षीमन ह्यता,

राम वनामा ग्या, व - व - व - व ऽ ऽ ऽ

राम वनामा ग्या, टठं त्यानी घर बांधा. राम लक्षीमनानी घर बांधा.

राम वनामा ग्या, व - व - व - व ऽ ऽ ऽ

राम - लक्षीमन - सीता - सम्द्याना भूक लागी. भूक लागी त काय खादा ? - कंदमुळा खादा.

राम वनाया ग्या, व - व - व - व ऽ ऽ ऽ

अशी तो सुरत्या रात्रभर सुरतवर रामकथा सांगत असतो.

कातकरी जमात अंधश्रद्धाळू, भुताखेतांवर विश्वास असणारी. पितरांना मान देणारी. यातून ते मृत व्यक्तीस स्मशानात पाणी देताना प्रेताला लाथ मारून सांगणे सांगतात :

भटाने जन्मा जाशील,त -
शेंडीला गाठमारी मरशील.

आगऱ्याने जन्मा जाशील, त -
कामकरी मरशील.

दुकानदारने जन्मा जाशील, त -
हिसाब करी मरशील

शिक्षनदाराने जन्मा जाशील, त -
लिखीलिखी मरशील.

शेठ सावकाराने जन्मा जाशील, त -
पैस पैसा करी मरशील.

आन कतकऱ्याने जन्मा जाशील, त -
वनचा राजा ह्यशील !

कातकऱ्यांना स्वत:ला 'वनचा राजा' म्हणण्यात अभिमान वाटतो. 'वनानं राजं आमी वनवासी, कोनाना भ्या नेहे आमनासी.' असे ते निर्भयपणे गातात.

कातकरी बोलीत अनेक कथा – दंतकथा – सांगितल्या जातात. गोष्ट सांगण्यापूर्वी ती सांगणारा – 'मा यक गोष्ठ आखहं' (मी एक गोष्ट सांगतोय) असे बोलून गोष्ट सांगायला सुरुवात करतो.

**कुक्कुर कोलना गोठ**

हे ऽऽ पूर्वी हे कुक्कुर आपले घरमा ना ह्यता. रानामा ह्यता. हे ऽऽ कुक्कुर वनवासी ह्यता. न कोला अपला ह्यता. कोला पाळीव परानी ह्यता. हे ऽऽ कुक्कुर मोठला लबाड. तो यकदीस कोल्या बोलं, 'कोल्यादा मा गावामा पावना यहं, तू रानामा ज. मा अठं चार दीस रहीन, मंग परत इन.' हे ऽऽ त बा कोला रानामा ग्या. कुक्कुर गावामा आना. पन कुक्कुर जो पावना आना तो अठंज रहा. ग्याच नेहे. तवशी कोला आपली सम्दी पोराबाळा लेहे गावापा येहे न हुक हुकी हूहू करं आर्डहं. आपला राज मांगहं. तो कुक्कुरा बोलहं - मा गावामा यहं, मा गावामा यहं -

(हिना - झाले, वनामा - वनात, ग्या - गेला, ह्यता - होता, खादा- खाल्लं, कातकऱ्याने - कातकऱ्याच्या, कुक्कुर - कुत्रा, घरमा - घरात, कोल्या - कोल्ह्याला, यहं - येतोय, ज - जा, अठं - इथे, इन - येईन, आना - आला, लेहे - घेऊन, गावापा - गावाजवळ, आर्डहं - ओरडतो, राज - राज्य (हक्क).

वरील गीत - गायन, कथनातून कातकरी बोलीची काही वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे सांगता येतील :

- 'ळ' चा खणखणीत उच्चार होतो - सकाळ, सगळी, काळा.
- 'ण' च्या जागी 'न' येतो - पण - पन, कोन, बान
- षष्ठीच्या चा,ची,चे / झा,झी,झे प्रत्ययांऐवजी ना, नी, ने हे प्रत्यय येतात - माझा - माना, राजाचा - राजाना, तुझी - तुनी.
- सप्तमीच्या त,ई,आ - प्रत्ययांऐवजी - 'मा' प्रत्यय येतो - घरात - घरमा, रानात - रानामा

ह्या बोलीतील षष्ठी, सप्तमीचे प्रत्यय विचारात घेतले आणि शब्दांचे अर्थ कळले की ही बोली कळण्यास सोपी जाते.

ह्या बोलीतून बोलण्यास सुरुवात करताना नेहमी 'हे ऽऽ' अशी हेल काढून बोलण्याची पद्धत आहे. 'हे ऽऽ टठं काय आहा रं ?' (तिथे काय आहे रे ?) बोलताना वाक्यात मध्ये मध्ये 'रं' घेऊन बोलण्याची त्यांची एक लकब आहे. पण त्या 'रं' चा प्रत्येक वेळी 'रे' असा अर्थ असतोच असे नाही. कातकरी स्त्री पुरुषाला काही विचारताना 'काय रं' 'र'चा वापर करते, तर पुरुष स्त्रीला विचारताना 'काय व' - 'व' चा वापर करतो. कातकरी बोलीत आदरार्थी सर्वनामे नाहीत. 'तू रं', 'तो रं' ही सर्वनामे तू - आपण, तो - ते अशा अर्थाने वापरतात. थोडक्यात ही अरे - तुरेची बोली आहे. ह्या बोलीत स्नान - संध्या, आरती, निसर्ग, साहित्य वाङ्मय, ताई, माई असे शब्द नाहीत.

ही बोली हिन्दी, मराठी, गुजराती आणि संस्कृत ह्या भाषांशी जवळीक असणारी बोली आहे. ह्या पाच भाषांतील काही शब्द पाहा -

| मराठी | कातकरी | हिन्दी | गुजराती | संस्कृत |
|---|---|---|---|---|
| घोरपड | गोहोर | गोहोर | पाटलागो | गोधा/गोधिका |
| उंदीर | चिवा | चुहा | उंदर | उंदरू |
| बेडूक | देडूक | मेंढक | देडको | मंडूक |
| बाटली | शिशी | शीशी | बाटली | --- |
| जवळ | पा | पास | पास | समीप |
| आहे | हेहे | है | छे | अस्ति |
| नाही | नेहे | नही | नथी | नास्ति |
| केव्हा | कद्धा | कभी | क्यारे | कदा |
| तेव्हा | तद्धा | तव | त्यारे | तदा |
| गेला | ग्या | गया | गयो | गत |
| घे | ले/लेहे | ले | ले | (ग्रह्) |
| घेतला | ला/लिदा | लाया | लिदू | (ग्रहीत्) |
| इथे | अठं | यहाँ | अटे | अत्र |
| तिथे | टठं | वहाँ | तटे | तत्र |
| भाऊ | भाव | भाई | भाई | भ्रातृ |
| बहीण | भन | बहन | बेन | भगिनी |
| रात्र | रात | रात | रात | रात्रि |
| संध्याकाळ | सांज | शाम | सांज | संध्या |
| आज | आज | आज | आज | अद्य |
| सकाळ | सकाळ | सबेरा | सवार | सत्काल |
| दुपार | दुपार/दुफार | दोपहर | बपोर | द्विप्रहर |
| केवढा | कोडा | कितना | केटला | कियत् |
| कोठे | कुसं | कहाँ | क्या | कुत्र |
| थंडी | शी | सर्दी | थंडी | शीत |
| तंबाखू | तांबिख/तंबाख | तमाकू | तंबाखू | --- |
| मुंगूस | नांगुळ्या | नेवला | नोलिया | नकुल |
| बगळा | बगुला | बगुला | बगलो | बक |

| मराठी | कातकरी | हिन्दी | गुजराती | संस्कृत |
|---|---|---|---|---|
| मजुरी | मंजरी/मंज्री | मजदूरी | मजुरी | --- |
| भूक | भूक | भूख | भूख | बुभुक्षा |
| सिंह | शीव | सिंह | सिंह | सिंह |
| कोंबडा | कुकडा | मुर्गा | कुकडा | कुक्कुट |
| कुत्रा | कुत्रा/कुकुर | कुत्ता | कुतरो | कुक्कुर |
| मचाण | माचली | मचान/माचा | मचाण | मंचक |
| ससाणा | शिक्रू | शाहीन | सारस | श्येन |
| गिधाड | गिध | गीध | गीध | गृधृ |
| चिमणी | चिडी | चिडिया | कागडो | --- |
| चोळी | चोळी | चोली | चोली | चोली |
| द्रोण | दुरुंड | दोना | पडिलो | द्रोण |
| कुऱ्हाड | कुराड | कुल्हाडी | कुहाडी | कुठार |
| चूल | चूल | चुला | चुलो | चुल्लि |
| धनुष्य | धनू | धनुष | धनुष | धनु |
| करवंद | करुंदा | करौंदा | करमदे | करमद |
| रांड (विधवा) | रंडवा | राँड | राँड | रण्ड: |

वरील भाषांतील शब्द पाहिले की कातकरी बोलीची मराठी, हिन्दी, गुजराती, संस्कृत भाषांशी किती घनिष्ट जवळीक आहे हे स्पष्ट होते. काही कातकरी हे गुजरातकडून महाराष्ट्रात उतरले असे काहींचे म्हणणे आहे, ते कातकरी - गुजराती बोली साम्यावरून पटू लागते.

आर्य भारतात आले, त्यांची संस्कृत भाषा, आर्यांच्या आधी इथे आदिवासी कातकरी होते. त्यांची स्वतंत्र बोलीभाषा होती. मग गोहोर, कद्दा, तद्दा, ग्या, अठं, टठं, शी, कुसं, नांगुळ्या, कुकडा, कुकुर, गिध, कुराड, चूल, धनू, करुंदा, रंडवा हे शब्द पाहिले की सहजच वाटते की हे कातकरी बोलीतील शब्द संस्कृत (वा अन्य) भाषेतून अपभ्रंश होऊन आलेले नसून उलट संस्कृत (वा अन्य) भाषेत ते कातकरी बोलीतून उद्‍भ्रंश होऊन गेले असावेत. चूल - चुल्लि, वाल - वल्ल वगैरे देशी शब्दांचे नंतर संस्कृतीकरण झाले आहे. त्याप्रमाणे : दुरुंड - द्रोण, कुराड - कुठार, नांगुळ्या - नकुल, करुंदा - करमदा, धनु - धनू, रंडवा - रण्ड, कुकडा - कुक्कुट वगैरे कातकरी बोलीतील शब्दांचे नंतर संस्कृतीकरण झाले असावे.



अनुक्रमणिका

साकू (अंडे), वाळूक (काकडी), किर्वा (खेकडे), दुंदा (पिटकूर) ढुडा (घुबड) हे खास कातकरी बोलीतील शब्द असून महानुभाव पंथातील बोलीत साळा (शाळा), साळोकी - सालुकी (साळुंकी), चाटसी - चाटू (उलथणे, कालथा) हे ह्या बोलीतील शब्द आढळतात.

वर्तमान काळातील चालू क्रियेविषयी विचारताना आपण 'काय करीत आहेस? असे विचारतो तर कातकरी बोलीत 'काय करहं ?', 'काय खादहं ?' (खातोस) असे विचारले जाते. भूतकाळात 'काय करहस ?', 'काय खादहस ?' असे विचारले जाते. भविष्य काळात 'काय करसाल ?', 'काय खासाल ?' असे विचारले जाते 'कुठून आला?' अशा अर्थी 'कुसून आनास?' किंवा 'कुनूक आनास?' असे क्रियापदास 'स' जोडून भूतकाळ दर्शविला जातो. करणे - करसाल, खाणे - खासाल, जाणे - जासाल असे क्रियापदास 'साल' जोडून भविष्यकाळ दर्शविला जातो. 'च' च्या ऐवजी 'ज' येतो. तुलाच - तुलाज, एवढाच- यवडाज, तुझाच - तुनाज. जवळ, पाशी ह्या अर्थी 'पा' वापरला जातो. तुझ्याजवळ - तुपा, माझ्याजवळ - मापा, गावापाशी गावापा. संबोधनात 'नो' च्या ऐवजी 'नू' वापरला जातो. पोरांनो - पोरांनू.

आदिवासी लोक ज्या प्रदेशात राहतात त्या प्रदेशातील कुणबी (शेतकरी) समाजाशी त्यांचा घनिष्ट संबंध येतो. त्या कुणब्यांशी ते त्यांच्या कुणबी बोलीत बोलतात. बाकी आदिवासी आपल्या समाजाशी नेहमी आदिवासी बोलीत बोलतात. त्याप्रमाणे कातकरी आपल्या समाजाशी नेहमी कातकरी बोलीत बोलतात. कातकरी लोकांचा संबंध रायगडमध्ये आगरी, माळी, कोळी, कुणबी, ब्राह्मण, मुसलमान वगैरे लोकांशी आल्याने ते त्यांच्याशी तेथील प्रादेशिक अशा आगर बोलीतच बोलतात. त्यामुळे त्या बोलीचा प्रभाव त्यांच्या बोलीवर मोठ्या प्रमाणात पडला आहे. शहरानजीकच्या कातकरवाड्या बदलल्या आहेत. तेथील कातकऱ्यांची नवी पिढी शहरांत कामधंद्यासाठी जात आहे. शिकत आहे. त्यांच्या तोंडची पूर्वीची कातकरी बोली हरवत चालली आहे. नवी पिढी कातकरी बोली बोलत असली तरी ती पूर्वीची हेल, हे खास कातकरी बोलीतील अर्थपूर्ण शब्द त्यांच्या बोलण्यात नाहीत. रानावनातील दुर्गम भागातील कातकऱ्यांत मात्र ही बोली टिकून आहे. ह्या बोलीतील लोककथा खास आहेत. 'सुरत' लावल्यावर तीवरून कातकरी बोलीतून रात्रीच्या घनगर्द काळोखात पुराणकथा ऐकताना आजही भान हरपून जाते. ■

तुलसी निवास, ए -202, विजया बँकेजवळ, भूखंड - 383,
सेक्टर 19, कोपरखैराणे नवी मुंबई - 400 709.
दूरभाष (022) 2754 5531

# धुळे जिल्ह्यातील दलित स्त्रियांची भिमओवीगीते : एक अन्वयार्थ

प्रकाश भामरे

डॉ० बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रेरणेने भारतीय साहित्यात 'दलित साहित्य' नावाचे प्रचंड परिवर्तनवादी वादळ निर्माण झाले आहे. डॉ० बाबासाहेब आंबेडकरांनी 'शूद्र पूर्वी कोण होते ?', 'अस्पृश्य मूळचे कोण ?', 'भगवान बुद्ध आणि त्यांचा धम्म' यांसारखी पुस्तके लिहून दलितांना इतिहास, धर्म, संस्कृती दिली.

लोकांचे नायक म्हणून ते आधुनिक लोकवाङ्मयाचे, लोकगीतांचेही नायक ठरले आहेत. स्वत: डॉ० बाबासाहेब आंबेडकर लोकवाङ्मयाच्या संदर्भात म्हणाले होते की, ''लोकवाङ्मय ही आमच्या संस्कृतीची संपत्ती आहे; व तिचे जतन व संवर्धन आम्हाला केले पाहिजे; त्यात आमचा पूर्वेतिहास सामावलेला आहे.'' आज डॉ० बाबासाहेब आंबेडकर लोकवाङ्मयाचा म्हणजेच ओवीगीतांचा विषय झालेले आहेत. धुळे परिसरातील ग्रामीण दलित (नवबौद्ध) स्त्रियांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कार्यकर्तृत्वावर, त्यांनी पुकारलेल्या मानवमुक्तीसाठीच्या लढ्यांवर शेकड्यांनी ओवीगीते रचली आहेत. धुळे ग्रामीण परिसरातील दलितांची बोली अहिराणी असल्यामुळे या ओव्यांची रचना अहिराणी बोलीत झालेली आहे.

**एक दलित स्त्री म्हणते,** ''भिम भिम करू, भिम केयीना वं मया
भिमना मयामान, मिये सग्यसले साया''

डॉ० बाबासाहेब आंबेडकरांचे दलितांच्या, वंचितांच्या प्रती असलेले योगदान या स्त्रीला केळीच्या थंडगार मळ्याप्रमाणे वाटते. केळीच्या मळ्यात जसा गारवा असतो; तसा गारवा माझ्या भिमाच्या कार्यकर्तृत्वामुळे सर्वांना मिळत आहे. हा गारवा किंवा 'साया' प्रतिकात्मक आहे. ही 'साया' किंवा सावली शैक्षणिक आहे, आर्थिक आहे, सामाजिक आहे, सांस्कृतिक आहे; आणि धार्मिकही आहे. या सावलीच्या आश्रयाला जो कोणी येईल त्याची प्रगती, विकास व ऐहिक सुखवर्धन निश्चित आहे, असा आशावाद प्रस्तुत ओवीतून व्यक्त होतो :

''भिम भिम करू, भिमनी फुलाई आमराई
भिमनी आमराईमा, व्हयनी सग्यासनी कमाई''

भिम भिम करू, भिम सुगरीनना खोपा
आते नही कायजी, सग्या निचित झोपा''

भिमाने ही जी आमराई फुलविली आहे, त्या आमराईतून ज्याला जे हवे; ते तो घेऊ शकतो व आत्मकमाई करून स्वत:चा उद्धार स्वत: करून घेऊ शकतो. ही आमराई शिक्षणाची आहे म्हणजे विचारांची-ज्ञानाची आहे, आत्मभानाची, स्वाभि-मानाची, मानवतेची, देशप्रेमाची आहे. या आमराईतले एक-एक आंब्याचे फळ म्हणजे ज्ञान-विज्ञानाचे एक एक क्षेत्र आहे. ज्याला ज्या क्षेत्रात प्रावीण्य मिळवायचे तो त्या क्षेत्रात आपला ठसा उमटवू शकतो; असा या ओळीचा अन्वयार्थ सांगता येईल.

''मन्हा भिमनी कया, घटना लिखीसन कायदा
गोर-गरीब जनताले, मियना जगाना वायदा''
''भिम भिम करू, भिम मन्हा गयाना ताईत
भिमनी लिखी घटना, कायदा व्हयना माईत''
''भिम भिम करू, मन्हा हातमा हिरवा चुडा
भिमनी उचला एकला, घटना लिखाना पैनईडा''

भारतीय राज्यघटना या खंडप्राय देशाचा सर्वश्रेष्ठ व पवित्र दस्तऐवज आहे. भारतीय घटनेचे प्रमुख शिल्पकार डॉ० बाबासाहेब आंबेडकर आहेत हे सर्वश्रुत आहे. घटनानिर्मितीच्या या प्रचंड कार्यामुळे निरक्षर दलित स्त्रीही प्रभावित होते व उपरोक्त ओव्या तिच्या ओठांवर येतात. राज्यघटनारूपी कायदा करून भयमुक्त व सन्मानाने जगण्याची संधी बाबासाहेबांनी उपलब्ध करून दिली. तळागाळातील स्त्री-पुरुषांना जगण्याचा 'वायदा' मिळाला, म्हणजे एक प्रकारचा विश्वास मिळाला; असे या स्त्रीचे म्हणणे आहे. घटनेच्या माध्यमातून सर्वसामान्य जनतेला भारतीय राजकारणाचा अविभाज्य भाग बनविले.

भारतीय राज्यघटनेमुळे दलितांचे जीवन उजळून निघाले म्हणून 'भिम' म्हणजे दलितांच्या गळ्यातील 'ताईत' आहे, अशी भावना ही स्त्री बोलून दाखविते. 'माणूस' हा लोकशाही व्यवस्थेचा केंद्रबिंदू असला पाहिजे अशी बाबासाहेबांची मूलभूत भूमिका होती. माणसाचे कोणत्याही बाबतीत शोषण होता कामा नये असे त्यांचे मानवतावादी धोरण होते. सर्वसामान्यांना न्याय-अन्याय समजू लागले, हक्क-कर्तव्यांची जाणीव झाली, मतदानाचे महत्त्व उमजले. एका दृष्टीने दलितांना आत्मभान आले. म्हणून ही स्त्री म्हणते 'कायदा व्हयना माईत' म्हणजे घटनेमुळेच कायद्याचे आकलन झाले. धुळे जिल्ह्यातील दलित स्त्रियांच्या ओवीगीतांमध्ये मोठा आशय पेलण्याचे सामर्थ्य आहे, हे आपल्या सहज लक्षात येईल.

भारतीय राज्यघटना ही लोकशाही राष्ट्रांची आदर्श अशी राज्यघटना आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जगातील अनेक देशांच्या राज्यघटनांचा अभ्यास केला व या खंडप्राय देशाची राज्यघटना लिहिण्याची प्रमुख जबाबदारी उचलली. या संदर्भात दलित स्त्री म्हणते, ''भिमनी उचला एकला, घटना लिखाना पैनईडा.'' घटना लेखनाचा पैजेचा विडा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी एकट्यानेच उचलला असे ही स्त्री म्हणते; व त्यात ऐतिहासिक तथ्यही आहे व सत्यही आहे. मसुदा समितीचे सात सदस्य होते. परंतु घटनेच्या मसुद्याबाबतची सर्व जबाबदारी डॉ० बाबासाहेब आंबेडकरांनीच पार पाडली असे म्हणायला हरकत नाही. श्री. टी.टी. कृष्णम्माचारी यांनी आपल्या भाषणात हा मुद्दा स्पष्ट केला आहे. ते म्हणतात, ''मसुदा समितीच्या सात सभासदांपैकी एकाने राजीनामा दिला. एका सभासदाचे निधन झाले, एक अमेरिकेत होता, आणि एक सभासद राज्याच्या राजकारणात गुंतलेला असल्याने वेळ देऊ शकला नाही. आणखी एक-दोन सभासद दिल्लीपासून दूरच्या गावचे असल्याने समितीच्या बैठकांना येऊ शकले नाहीत. शेवटी मसुदा तयार करण्याचे सर्व काम डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनाच करावे लागले.'' या समितीतील इतर सदस्यांनी घटनानिर्मितीच्या बाबतीत मौलिक सहकार्य केलेले असले तरी स्वातंत्र्य, बंधुता, समता व न्याय या चतु:सूत्रीवर आधारित या घटनानिर्मितीत डॉ० बाबासाहेब आंबेडकरांचा सिंहाचा वाटा होता हे शत्रूलाही मान्य करावे लागेल. घटनानिर्मितीचा हा 'विडा' एकट्या माझ्या भिमानेच मोठ्या धाडसाने उचलला हे ऐतिहासिक सत्य ही स्त्री उपरोक्त ओवीतून सांगत आहे.

डॉ० बाबासाहेब आंबेडकरांच्या जीवनपर्वामध्ये महाडचा चवदार तळ्याचा सत्याग्रह, काळाराम मंदिरप्रवेश सत्याग्रह या आंदोलनांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. या आंदोलनांचे पडसादही दलित स्त्रीमनात उमटले व सहजस्फूर्तपणे या आंदोलनांना अधोरेखित करणाऱ्या ओव्या तिच्या ओठावर आल्या. एक दलित स्त्री म्हणते,

''भिम भिम करू, भिम पिन्हा महाडनं पानी
भिमनं पानी पीसन, माले नवी सूद उनी''

१९२६ साली सातारा जिल्ह्यातील रहिमतपूरला भरलेल्या महार परिषेदत डॉ० बाबासाहेब आंबेडकरांनी महारांना वतनदारी व गावकीचे हक्क सोडून द्यायला सांगितले. शेकडो महार लोकांनी गावकीची कामे सोडून दिली. २० मार्च १९२७ रोजी महाडचे चवदार तळे दलितांना पाणी पिण्यासाठी मुक्त व्हावे यासाठी त्यांनी आंदोलन उभे केले. लाखो दलित स्त्री-पुरुष या आंदोलनात सामील झाले होते. चवदार तळ्याचा हा सत्याग्रह केवळ पाण्याचा लढा नव्हता; तर तो मानवमुक्तीचा लढा होता.

तो एक धर्मसंगर होता. ते पाणी प्याल्याने दलित समाज अमर होणार होता, अशातला भाग नाही. हे पाणी पिणे प्रतीकात्मक होते. या पाण्यानेच माझ्यात पाणी आलं,' असे एक दलित कवी सहज म्हणून जातो. तशाच पद्धतीने 'भिमनं पानी पिसन, माले नवी सूद उनी' असे दलित स्त्री सहज म्हणून जाते.' 'सूद येणे' म्हणजे 'आत्मभान प्राप्त होणे,' आत्मजाणीव निर्माण होणे.

डॉ० बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रत्येक आंदोलनाच्या पाठीमागे मानवी प्रतिष्ठेचे अधिष्ठान होते. आम्हीही माणसे आहोत व म्हणून माणसांना मिळणारे सर्व हक्क आम्हाला मिळणे क्रमप्राप्त आहे; अशी त्यांची धारणा होती. काळाराम मंदिराच्या सत्याग्रह आंदोलनाच्या संदर्भात एक दलित माता म्हणते,

''बाबानी सत्याग्रह कया, कायाराम मंदिरमा
बाबानी हिम्मत देखी, राम लाजना मनमा''

बाबासाहेबांचे दर्शन घेऊन, त्यांचे विचार ऐकून नाशिकचा काळाराम मनोमन लाजला असेल अशी कल्पना ही स्त्री करते. दर्शन घेणे व कृतकृत्य होणे किंवा पवित्र होणे अशी भावना ह्या चळवळीमागे मुळीच नव्हती. ''तुम्ही जर आम्हाला हिंदू मानत असाल तर हिंदूंच्या मंदिरात जाणे हा आमचा त्या धर्माचे अनुयायी म्हणून हक्कच आहे'' असे बाबासाहेबांचे म्हणणे होते. डॉ० आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली काळाराम मंदिरप्रवेशाचा सत्याग्रह पाच-सहा वर्षे चालला; परंतु काही उपयोग झाला नाही. तेव्हा बाबासाहेबांनी १९३५ साली येवले मुक्कामी धर्मांतराची घोषणा केली, तेव्हा ही घोषणा ऐकून जणू एक दलित स्त्री म्हणते,

''कसाले लेऊ आते, राम तुनं नाव
भिम आमना देव, बुद्ध आमनं गाव''
''राम राम ईसरा, आते करा 'जयभिम'
भिमनी कया चमत्कार, पलटी गयात आपला दिन''

धर्मांतरानंतर दलित स्त्रियांच्या मनातही परिवर्तनाचे वारे वाहू लागले वरील ओव्या त्याचे द्योतक आहेत. डॉ० बाबासाहेब आंबेडकरांनी दलितांच्या जीवनातील शिक्षणाचे महत्त्व जाणले होते. त्यांनी समस्त दलित समाजाला 'शिका' हा मूल्यवान संदेश दिला; कारण 'शिक्षण म्हणजे जाणीव जागृती' अशी त्यांची शिक्षणाची व्याख्या आहे. शिक्षणाशिवाय तुमच्या जीवनातील अज्ञानाचा, अंधश्रद्धांचा, दैववादाचा अंधःकार दूर होणार नाही. म्हणून तुम्ही खूप शिका, असे ते आपल्या अनुयायांना वारंवार सांगत. नेमका हाच आशय पुढील ओव्यांमधून अगदी सहजपणे व्यक्त होताना आढळतो.

''भिमनी सांगं आमले, तुम्हे मन लाई शिका
पैसाना करता कोनले, 'शील' नको ईका''

शिक्षण हे सर्व समस्यांवरचा उपाय आहे असे बाबासाहेबांनी आपल्या अडाणी बांधवांना सांगितले; परंतु शिक्षणाबरोबर त्यांनी 'शीला'चेही महत्त्व जाणले होते. शिक्षणाचा संबंध त्यांनी प्रज्ञा आणि शील यांच्याशी जोडला आहे 'प्रज्ञा' म्हणजे 'शहाणपण' आणि 'शील' म्हणजे सदाचार संपन्न आचरण होय. शीलाशिवाय शिक्षण म्हणजे राष्ट्राचा विनाश होय असे त्यांचे म्हणणे आहे. 'शीलाशिवाय शिक्षणाची किंमत केवळ शून्य आहे असे डॉ० आंबेडकर म्हणतात. हा संदेश ''पैसाना करता कोनले, शील नको ईका'' या ओवीतून सहज प्रकट होतो. पुढे ती स्त्री म्हणते,

''भिम भिम करू, भिम ग्यानना सागर
भिमना ग्यानना मांडा, गावोगाव जागर''

डॉ० बाबासाहेब आंबेडकरांनी कठोर परिश्रमाने जे ज्ञान प्राप्त केले; त्या ज्ञानाचा प्रचार आणि प्रसार दलित समाजामध्ये व्हायला हवा; असा आशावाद उपरोक्त ओवीतून प्रकट होतो. इष्ट आणि अनिष्ट, नैतिक आणि अनैतिक, अमानुषता आणि मानवता यातून सर्वकल्याणकारी जीवनादर्शाची निवड करण्याची क्षमता शिक्षणात असली पाहिजे, असे डॉ० आंबेडकरांचे म्हणणे होते. समाजाला न्यायाकडे, प्रकाशाकडे नेणारी परिवर्तनाची पायवाट शिक्षणाने निर्माण केली पाहिजे. मानवाच्या सर्व प्रकारच्या शोषण-मुक्तीची सुंदर स्थिती शिक्षणाने निर्माण केली पाहिजे. अशा या आंबेडकररूपी ज्ञानाचा जागर खेडोपाडी मांडला जावा; असा या ओवीचा अन्वयार्थ सांगता येईल.

''वढू नका मरेल ढोरे, द्या हाई काम सोडी
पोरे-पोरी सायमा धाडा, लवा त्यासले शिकानी गोडी''

जुन्या काळातली गुलामगिरी सोडा, घाणेरडी कामे करू नका, वतनदारी पद्धतीचे, बलुतेदारी पद्धतीचे गोडवे गाऊ नका. त्यापेक्षा आत्मसन्मानाला महत्त्व द्या. असे बाबासाहेब वारंवार सांगत. आपल्या पोराबाळांना शिक्षणाचे महत्त्व पटवून द्या. शिक्षणामुळे संपूर्ण जीवनाचा कायापालट होतो म्हणून त्यांना शिक्षणाची गोडी लावा हाच संदेश प्रस्तुत ओवीतून व्यक्त होतो.

''मन्हा बाबानी कयात, कायदा उलट-पालट
शिकनं महारनं लेकरू, चाले जसं डोलत''

शिक्षण हे वाघिणीचे दूध आहे; जो ते प्राशन करील तो गुरगुरल्याशिवाय राहणार नाही. शिक्षणामुळे बोलणे, चालणे, वागणे या सगळ्या गोष्टींमध्ये परिवर्तन घडून येते म्हणून ही स्त्री म्हणते, ''शिकनं महारनं लेकरू, चाले जसं डोलत'' – एवढा

आत्मविश्वास शिक्षणामुळे येतो. शिक्षण म्हणजे आत्मभान, शिक्षण म्हणजे जाणीव-जागृती, शिक्षण म्हणजे सदाचार, शिक्षण म्हणजे नीती असे बाबासाहेबांचे म्हणणे होते. हे म्हणणेच अप्रत्यक्षपणे या ओवीतून व्यक्त होताना आढळते.

डॉ० बाबासाहेब आंबेडकरांनी १४ ऑक्टोबर १९५६ या अशोकविजयादशमीच्या पवित्र दिवशी दलित समाजाला म्हणजेच महार समाजाला बौद्ध धर्माची दीक्षा दिली. सगळ्याच दलित जातींनी धर्मांतर करावे; अशी बाबासाहेबांची इच्छा होती; परंतु दुर्दैवाने तसे घडले नाही. परिणामी फक्त पूर्वास्पृश्य महार जातीतील स्त्री-पुरुषांनीच धर्मांतराला प्रतिसाद दिला. बौद्ध धर्म स्वीकाराच्या संदर्भात दलित स्त्री म्हणते,

''भिम भिम करू, भिमनी बांधा पिप्पयना पार
पिप्पयनी सायामान, जीव व्हयना गारेगार''

प्रस्तुत ओवीतील 'पिप्पयना पार' म्हणजे भारतात उद्ध्वस्त झालेल्या पिंपळाच्या झाडाखालील ओट्याची डागडुजी केली. त्याला पुनरुज्जीवन प्राप्त करून दिले. हा पिंपळाच्या झाडाखालील ओटा बौद्धधर्मांच्या पुनर्प्रवेशाचे सूचन करतो. तो ओटा 'धम्मप्रतीक' म्हणून या ओवीत आलेला आहे. बौद्ध संस्कृतीत पिंपळाच्या झाडाला 'बोधीवृक्ष' म्हटले आहे. याच पिंपळाच्या झाडाखाली अडीच हजार वर्षांपूर्वी 'ऊरुवेला' म्हणजेच 'बोधीगया' या ठिकाणी पौर्णिमेला सिद्धार्थाला ज्ञानप्राप्ती झाली होती. मधल्या काळात ह्या ओट्याचे संरक्षण आणि संवर्धन अशोकासारख्या राजांनी केले; परंतु काही राजांनी ह्या ओट्याला उद्ध्वस्त करण्यातच धन्यता मानली. अशा परिस्थितीत फार मोठ्या कालखंडानंतर डॉ० बाबासाहेब आंबेडकरांनी धम्मचक्राचे पुन्हा प्रवर्तन केले; व बुद्धाला मातृभूमीत परत आणले. समस्त दीन-दलित या पिंपळाच्या झाडाखालच्या ओट्याच्या आश्रयाला आले. 'जीव गारेगार' होणे म्हणजे शांती मिळणे होय. 'मनाची शांती म्हणजेच धम्म होय' असा अन्वयार्थ उपरोक्त ओवीचा सांगता येईल. पुढे एक स्त्री म्हणते,

'भिम भिम करू, भिमनी दावं पिप्पयनं झाड
भिमनी पाजी खीर, तोंड व्हई गये गोड''

बुद्धाच्या धम्मामध्ये 'पिप्पयनं झाड' म्हणजे 'पिंपळाचे झाड','खीर' या गोष्टींना ऐतिहासिक संदर्भ आहेत. पौर्णिमेच्या दिवशी सिद्धार्थाला बुद्धत्व प्राप्त झाले होते. सुजाता नावाच्या स्त्रीने बुद्धाला 'खीर' दिली होती. हीच 'खीर' भिमाने आम्हाला पाजली. 'खीर पाजणे' म्हणजे धम्मज्ञानाची प्राप्ती करून देणे, असा अर्थ या ठिकाणी या स्त्रीला अभिप्रेत आहे. तोंड गोड होणे म्हणजे संपूर्ण जीवनालाच गोडी येणे. हे सूचन प्रस्तुत ओवीतून होत आहे. धर्मांतराच्या संबंधी पुढील ओव्याही अन्वर्थक आहेत.



अनुक्रमणिका

''भिम भिम करू, भिम कमयनं फूल
भिमनी दावा मार्ग, बांधा बुद्धाना पूल''
''भिम भिम करू, भिम फणसना गरा
भिमनी दावा मार्ग, तोच आते खरा''
''भिमनी सांगं माल्हे, नको करू देव देव
बुद्धाना धम्मा शिवाय, आपलं नही दुसरं गाव''
''नको नको भाऊ सांगू, मंदिरमा जावाले
भिमनी बांधं विहार. शांती मियनी जीवले''

प्रस्तुत ओवीगीतांचा सूचकार्थ थोडक्यात पुढीलप्रमाणे मांडता येईल. भिम म्हणजेच डॉ० बाबासाहेब आंबेडकर जणू कमळाचे फूल आहे. कमळाला बौद्ध धम्मामध्ये वेगळे स्थान-महत्त्व आहे हे या ठिकाणी लक्षात यावे. बाबासाहेबांनी जीवनप्रवास सुखाचा व्हावा म्हणून बुद्धाचा धम्मरूपी पूल दलितांना बांधून दिला आहे. ह्या पुलावरून भवसागर सहज पार करता येईल, अशी सूचना या ओवीतून मिळते. भिमाने दाखवलेला बुद्धाचा जीवनमार्ग हाच खरा जगण्याचा मार्ग आहे. म्हणून देव-देव करत फिरण्यापेक्षा स्वत:चा उद्धार स्वत:च करावा. 'अत्त दीपो भव-स्वयंप्रकाशित व्हा व जगाला प्रकाश द्या' ही बुद्धाची विचारसरणी आत्मसात करा, याचा पुरस्कार जणू ही स्त्री प्रस्तुत ओव्यांमधून करत आहे. डॉ० बाबासाहेब आंबेडकरांचे व्यक्तिमत्त्व इतके प्रचंड होते की, त्यांचे वर्णन करण्यासाठी भाषेतले शब्द अपुरे ठरतात. साहित्यातल्या उपमा-उत्प्रेक्षा अपुऱ्या पडतात. भिमाला दलित स्त्रिया वेगवेगळ्या उपमा-उत्प्रेक्षांनी अलंकृत करण्याचा प्रयत्न पुढील ओव्यांतून करतांना आढळतात,

''भिम भिम करू, भिम कोहिनुरी हिरा
भिमनी दिन्हं ग्यान, नही आटाव आते झरा''
''भिम भिम करू, भिम जसा सोनाचा ताट
आज भिमनी जयंती, सग्या गावमा साखर वाट''
''भिम भिम करू, भिम जसी सोनानी साकी
भिमनी चमक देखी, दुस्मन गया फाकी''
''भिम भिम करू, भिम चांदीनं पदक
भिमना फोटो ओवाडाले घडं सोनानं तबक''

अशा विविध उपमा देऊन दलित स्त्रिया डॉ० बाबासाहेब आंबेडकरांविषयीचा आपल्या हृदयातील, मनातील भाव व्यक्त करतात. ■

'अजिंठा'/28, रघुवीर नगर, खोडाई माता रोड, नंदुरबार, जि. नंदुरबार 425 412.

# बरेवाईट, शून्य अर्थ वगैरे : एक अनौपचारिक चर्चा

अशोक रा. केळकर

सप्टेंबर २००८मधे डॉ० म.अ. मेहेंदळे आणि डॉ० अशोक रा. केळकर या दोघांची एक पत्रचर्चा झाली. तिचा गोषवारा पत्रिकेच्या वाचकांना रोचक वाटावा. वाचकांच्या सोयीसाठी चौकोनी कंसात खुलासे टाकले आहेत.

**मेहेंदळे :** 'जर माझे बरेवाईट झाले तर' मधे 'बरे' हे शब्दरूप अर्थाने शून्य नाही का?

**केळकर :** तुमची शून्य अर्थरूप ही कल्पना शून्य शब्दरूप या कल्पनेवरून सुचलेली दिसते [sheep follow each other मधे sheep नंतर बहुवचनासाठी नेहमीच्या s प्रत्ययाऐवजी शून्य शब्दरूप येते.] मात्र 'बरेवाईट' या उदाहरणात मला एक अडचण दिसते. 'बरेवाईट' म्हणजे 'बरे किंवा वाईट'. आता ही उदाहरणे पाहू.

(१) माणसाला त्याच्या विवेकबुद्धीने बरेवाईट कळते.

(२) जर माझे बरेवाईट झाले तर विमा उतरलेला आहेच.

दोन्ही वाक्यांत 'बरेवाईट'चा अर्थ तोच. फरक एवढाच की दुसऱ्या वाक्यात 'जर माझे वाईट झाले तर' ह्या अप्रिय स्पष्टोक्तीऐवजी 'बरे (किंवा) वाईट' ही शोभनोक्ती (युफेमिझ्म) वापरली आहे. त्यामुळे 'बरे' या शब्दरूपाचा 'वरम्, चांगले' हा अर्थ रद्द होतो; तो मुळातच नसतो असे म्हणता येणार नाही. मूळ अर्थरूपाच्या जागी दुसऱ्या उदाहरणात शून्य अर्थरूप येते. म्हणजे नेमके काय होते ?

भारतीय परंपरेत भाषेच्या विचारात शब्द – शब्दार्थसंबंध – अर्थ अशी साखळी मानलेली आहे. यूरोपीय परंपरेतून आलेला आधुनिक भाषाविज्ञानाचा जनक आणि आधुनिक चिन्हमीमांसेचा सह-जनक फेर्दिनां द सोस्यूर सिग्निफायर – साइन – सिग्निफाइड (चिन्हक – चिन्ह – चिन्हित) असे त्रिक मानतो. [इथे शब्द म्हणजे 'स्पीच'; पद (वर्ड) नव्हे. चिन्हमीमांसेचा दुसरा सह-जनक चार्ल्स सँडर्स पर्स (Peirce) हा अमेरिकन गणिती व तत्त्वज्ञ.]

सोस्यूरच्या नंतरच्या भाषावैज्ञानिकांच्या ध्यानात आले की भाषिक चिन्हापासून अंतिम चिन्हक जो शब्द तिथपर्यंत शब्दांकन पोचते ते टप्प्याटप्प्याने. कधी शब्दांकनात पर्याय दिसतात.

| | |
|---|---|
| [विड़ा] - / विडा / - {विडा}<br>[डावा] - / डावा / - {डावा} | इथे / ड / या वर्णाचे शब्दांकन कधी स्फोटक [ड] तर कधी उत्क्षिप्त [ड़] |
| [म्हैस्] - / म्हैस् / - {म्हैस}<br>[म्हशी] - / म्हशी / - {म्हैस, बहुवचन} | इथे (म्हैस) या चिन्हाचे शब्दांकन कधी/म्हैस/शब्दरूप तर कधी/म्हस्/शब्दरूप. कधी शब्दांकन शून्यरूपी होते. |
| /वाट्या/ – {वाटी, बहुवचन}<br>/बशा/ – {बशी, बहुवचन} | इथे /ई/ या वर्णाचे शब्दांकन कधी / य्/पर्याय तर कधी शून्य पर्याय |

पाणिनी शून्य शब्दरूपाबद्दल बोलताना, लोप, अदर्शन असे शब्द वापरतो. [लुप्त शब्दरूपाऐवजी शून्य नसलेला पर्याय वापरणे म्हणजे अध्याहार. ('अध्याहृत' शब्दाचा अर्थ 'लुप्त' असा नाही !) उदाहरणार्थ, बरेवाईट मधे 'किंवा'चा अध्याहार करावा लागतो.]

भाषावैज्ञानिकांच्या असेही ध्यानात आले की भाषिक चिन्हापासून अंतिम चिन्हित जो अर्थ तिथपर्यंत अर्थांकन पोचते ते टप्प्याटप्प्याने. कधी अर्थांकनात पर्याय दिसतात. चिन्ह तेच पण अर्थरूपे पर्यायी असे दिसते.

{डावा हात} - / डाव्या बाजूचा हात / - [हृदय झुकलेल्या बाजूचा हात]

{डावा पक्ष} - / डाव्या विचाराचा पक्ष / - [वंचितांकडे झुकलेला पक्ष]

कधी अर्थांकन शून्यरूपी होते.

{उगी-च आलो} - / मुकाट्याने कारणाशिवाय - केवळ आलो /

{उगीच - च आलो} - / मुकाट्याने कारणाशिवाय - केवळ आलो /

इथे दुसऱ्या वाक्यातल्या पहिल्या {च}चे अर्थांकन शून्यरूपी ठरते.

**मेहेंदळे :** मला पण शून्य अर्थरूपांची दोन उदाहरणे सुचली आहेत. {सुस्वागतम्}मधे पहिला {सु} शून्यरूप अर्थाचा आहे. तो प्रचारात आला; कारण {स्वागतम्}मधे {सु} कालांतराने अर्थाच्या दृष्टीने शून्य ठरला! [कदाचित इंग्रजी 'वेल्कम्'ची छाया सुस्वागतम्वर पडली असावी.]

तुमचा शून्य शब्दरूप आणि शून्य अर्थरूप यांचा खुलासा नुसता विस्तृत नाही तर बऱ्याच प्रश्नांची उत्तरे देत जाणारा आहे. त्यावरून मला गमतीने ऐतरेयब्राह्मणातल्या हरिश्चंद्राच्या आख्यानातली एक ओळ आठवली : स एकयापृष्टः दशभिः प्रत्युवाच ।

एक विषयांतर करू का ? झीरॉक्ससाठी 'प्रकाशमुद्रित प्रत' ही तुम्ही



अनुक्रमणिका

वापरलेली संज्ञा आवडली, प्रचारात यायला पाहिजे. झीरॉक्स शब्दात ग्रीक भाषेतला Xeros म्हणजे dry हा शब्द आलेला दिसतो.

**केळकर :** Xerox हा ट्रेडमार्क आहे. तो सरसकट वापरू नये अशी त्या कंपनीची ताकीद आहे. त्या प्रक्रियेचे सामान्य नाव xerography किंवा photocopying आहे. त्यात शाईचा ओलेपणा नाही म्हणून xeros. छायाप्रत असाही शब्द प्रचारात आहे. पुण्यातले प्रदर्शनीय चित्रे काढणारे फोटोग्राफर कानिटकर यांनी 'छायाचित्र' न म्हणता 'प्रकाशचित्र' म्हणावे असा आग्रह धरला तो मला पटला, त्यामुळे छायाप्रत शब्दही पटला नाही.

**मेहेंदळे :** 'बरेवाईट'सारखा दुसरा एक अर्थरूपात 'किंवा' येणारा जोडशब्द मला आठवतो आहे - 'मानापमान.' त्याचा पुढीलसारखा काही वापर वाचल्याचे आठवते - 'मानापमानादिकांच्या पराण्या मना बा तुला सारख्या टोचती' - 'अपमान' टोचतो; पण 'मान' कसा टोचेल ? की तो शब्द इथे अर्थहीन ?

**केळकर :** 'मानापमान' या भाषाचिन्हाला दोन अर्थरूपे दिसतात : एक/मान किंवा अपमान/(हा हिंदी भाषेतही आढळतो); दुसरे/मानाचे हक्क राखले जाण्याबद्दलची असुरक्षितता किंवा अपमान होण्याबद्दलची असुरक्षितता. 'मानपान' शब्दाची छाया पडल्यामुळे हा अर्थ व्यंजित झाला, कालांतराने तो स्थिर होऊन अर्थरूप पावला.

**मेहेंदळे :** एका शब्दरूपाची अर्थच्छाया दुसऱ्या शब्दरूपाच्या अर्थावर कशी पडते याचे आणखी एक उदाहरण मला आठवते. रवींद्रनाथ ठाकुरांच्या गीतामधली ओळ पहावी : तव शुभ नामे जागे तव शुभ आशिष मागे

या दुसऱ्या 'शुभ'ला 'आशिष' शब्द असताना वेगळा अर्थ काय ? अशीच स्थिती मराठीमधल्या 'शुभाशीर्वाद'ची आहे.

**केळकर :** त्याच्यावर 'शुभेच्छा' शब्दाची छाया असावी. (प्रकाश नव्हे, छायाच !) 'शुभेच्छा दिल्या' अशा शब्दप्रयोगातल्या बहुवचनावर इंग्रजीमधल्या 'बेस्ट विशेज्'ची छाया असावी.

**मेहेंदळे :** आपल्या चर्चेचे संपादित इतिवृत्त 'भाषा आणि जीवन'कडे देण्याची कल्पना चांगली आहे. त्या वाचकांनाही त्यात मजा वाटू दे.) ■

7, **धनंजय**, 759/83, **भांडारकर रस्ता, गल्ली क्र.** 6, **पुणे** 411 004.

[**टीप :** ही चर्चा ऐकून चिन्हमीमांसा हे काय प्रकरण आहे अशी जर जिज्ञासा उत्पन्न झाली असेल त्यांनी अशोक रा. केळकर, 'मराठी भाषेचा आर्थिक संसार', मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद, १९७७, प्रकरण १ पाहावे.]



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र आणि मराठी भाषा

सुमन बेलवलकर

[परीक्षित पुस्तक - 'महाराष्ट्र आणि मराठी भाषा', डॉ० गं. ना. जोगळेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. १४ ऑगस्ट २००८. पृष्ठसंख्या १६४, किंमत २०० रु.]

मराठीचे ज्येष्ठ प्राध्यापक डॉ० गं. ना. जोगळेकर यांनी २००१-०२ साली रविवारच्या 'केसरी'त महाराष्ट्र, मराठी भाषा, मराठी माणूस यासंबंधी सदरलेखन केले होते. हे लेख श्रीविद्या प्रकाशनने डॉ० जोगळेकरांच्या प्रथम स्मृतिदिनी पुस्तकरूपाने प्रकाशित केले. प्रस्तावनेसह एकोणतीस लेख आणि दोन (प्रत्यक्षात तीन) परिशिष्टे असा या पुस्तकाचा एकूण प्रपंच आहे.

पहिल्या लेखात लेखकाने 'मराठी भाषा मुमूर्षु आहे' या वि. का. राजवाडे यांनी १९२६ मध्ये काढलेल्या शापवाणीसंदर्भातील विचाराचा इतिहास दिला आहे. राजवाडे यांच्या मृत्यूनंतर (३१ डिसेंबर १९२६) लगेचच ऑगस्ट १९२७ मध्ये 'रत्नाकर' मासिकात आणि पाठोपाठ सप्टेंबरमध्ये 'किर्लोस्कर' मासिकात श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे महाराष्ट्रगीत 'प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा' या अभिनिवेशात प्रसिद्ध झाले. जोगळेकरांनी या पुस्तकात महाराष्ट्रपर बहुतेक सर्व कवितांचा परामर्श घेतला आहे. त्यात सांगलीचे राजकवी साधुदास यांच्या महाराष्ट्रगीताचा मात्र उल्लेख नाही. फारसा अभिनिवेश न दाखवता साधुदासांनी

जी मानवैभवी श्रीमंती मानिते
जी कलागुणांचे धात्रीपण मिरविते
जी पुण्यतपांचे माहेरचि जागते

असे महाराष्ट्राचे सुभग स्वभावचित्रण केले आहे. महाराष्ट्राप्रमाणे मराठी भाषेसंबंधीच्या कवितांचा विचार डॉ० जोगळेकरांनी 'हिचे पुत्र आम्ही हिचे पांग फेडू' या लेखात केला आहे. अशा कवितांमध्ये रजाकारांच्या अत्याचारात भरडल्या जाणाऱ्या मराठवाड्यातील कवींच्या कवितांचाही उल्लेख आहे.

१ मे १९६० रोजी महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली. ही राज्यपुनर्रचना सहजासहजी घडली नव्हती. या घटना घडत होत्या त्या वेळी महाराष्ट्राला करावा

लागलेला संघर्ष पंचविशीतल्या जोगळेकरांनी प्रत्यक्ष पाहिला होता. संयुक्त महाराष्ट्राचा लढा आणि त्यामागील राजकीय खेळींची जोगळेकरांना चांगली माहिती होती. तो सर्व नजीकचा भूतकाळ आजच्या तरुण पिढीसमोर येण्याच्या दृष्टीने या पुस्तकातील तीनचार लेख महत्त्वाचे आहेत. मुंबईचा महाराष्ट्रात समावेश करण्यासाठी केवढे राजकारण घडले याची कल्पना या लेखांवरून येते.

प्रश्न महाराष्ट्राच्या रचनेचा असो, की औद्योगिक विकासाचा; त्यात विदर्भाचे वेगळेपण, मागासलेपण आणि त्याला जबाबदार असलेले घटक यांची चर्चा अधूनमधून डोके वर काढत असते. प्रा. जोगळेकरांनी या संदर्भात आपली मते अतिशय स्पष्टपणे, साधार मांडली आहेत. विदर्भाच्या 'अ़न्यायगंडा'वर त्यांनी आपल्या लेखणीचे चांगले फटकारे मारले आहेत.

महाराष्ट्र, मराठी भाषा यांचा विचार 'मराठी माणसा'वरील चर्चेशिवाय पूर्ण होत नाही. मराठी माणसाचे स्वभाव-विशेष, विशेषतः परप्रांतीयांच्या दृष्टीतून त्याचे चित्र आणि त्यामागची कारणमीमांसा ऐतिहासिक आधार देऊन जोगळेकरांनी स्पष्ट केली आहे. (मराठी माणसाबद्दल या पुस्तकात आठ लेख असल्यामुळे शीर्षकातही तसा उल्लेख झाला असता तर बरे झाले असते असे वाटते.)

महाराष्ट्रावरील लेखन 'मुंबई'शिवाय अपुरे राहील. मुंबईचा पोर्तुगीजकालीन भूगोल, ब्रिटिशांच्या - विशेषतः एल्फिन्स्टनच्या काळातील तिचा इतिहास, तिचा औद्योगिक विकास आणि परप्रांतीयांच्या लोंढ्यांमुळे तिची विनाशाकडे होणारी वाटचाल याविषयी जोगळेकरांनी या पुस्तकात सविस्तर चर्चा केली आहे. मुंबईच्या उभारणीत जगन्नाथ शंकरशेट यांचा मोठा वाटा होता. त्यांचा या पुस्तकातील अनुल्लेख खटकल्याशिवाय राहात नाही.

लेखकाने परिशिष्टात 'शुद्धलेखनातील अराजक', 'भाषा, लिपी आणि संवाद' तसेच 'मराठी बिघडवण्याचा आकाश(वाणी) मार्ग' अशा तीन विषयांचा विचार केला आहे. मराठी भाषेच्या शुद्धलेखन विषयक नियमांचे ऐतिहासिक टप्पे, महामंडळाच्या नियमांचा खुलासा आणि आरोपांचे खंडन पहिल्या परिशिष्टात चांगले केले आहे. हा विषय जोगळेकरांच्या अतिशय जिव्हाळ्याचा होता. (त्याला अनुसरूनच त्यांच्या प्रथम स्मृतिदिनी मराठीच्या शुद्धलेखनावर एक चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते.)

आकाशवाणीवरील, खास करून दिल्ली केंद्रावरून प्रक्षेपित होणाऱ्या बातमीपत्रांचे मराठी पूर्वीच्या तुलनेत किती आणि कुठे-कसे बिघडले आहे याची सोदाहरण चर्चा शेवटच्या परिशिष्टात आहे. आकाशवाणी आणि दूरदर्शनच्या मराठी बातमीपत्रांमधील भाषेविषयी डॉ० उज्ज्वला बर्वे यांनी अलीकडेच पीएच.डी.चा प्रबंध सादर केला आहे.

या माध्यमांवरील मराठी भाषा जाणकारांना खरोखर चिंतेचा विषय वाटावा अशीच आहे.

जोगळेकरांचे हे सदरलेखन सामान्य वाचकांना 'माहिती' मिळवण्याच्या दृष्टीने उपयोगी आहे. माहितीच्या जोडीला लेखनशैलीत जर रंजकता असती तर हे लेखन अधिक वाचनीय झाले असते. सदरलेखनाला काहीवेळा सुबोधता, फारशी बौद्धिक किंवा शास्त्रीय संशोधनात्मक चिकित्सा नसणे ही मर्यादा पडते. ती मर्यादा जाणवूनही हे लेखन वाचनीय आहे. ''महाराष्ट्र व मराठी'' या विषयांसंबंधी ज्यांना आस्था आहे, असे वाचक या पुस्तकाचा स्वीकार करतील अशी आशा लेखकाने प्रस्तावनेच्या अखेरीस व्यक्त केली आहे; ती यथार्थ आहे. ■

एफ़-44, सुंदरनगरी, 308, सोमवार पेठ, पुणे 411 011.
दूरभाष : 2611 1113

**ब्रिटिश कर्मचाऱ्यांचे इंग्रजी, गणित कच्चे !**

ब्रिटनमधील कर्मचाऱ्यांचे गणित आणि इंग्रजी अगदी कच्चे असल्याने व्यवसायामध्ये दर वर्षी किमान दहा अब्ज पौंडांचे नुकसान होत आहे, याकडे लक्ष वेधत उद्योजकांनी शालेय अभ्यासक्रमात या विषयांवर जादा भर देण्याची मागणी केली आहे.

ब्रिटनमधील व्यापारी आणि उद्योगपतींची संघटना असलेल्या 'कॉन्फेडरेशन ऑफ ब्रिटिश इंडस्ट्रीज'ने (सीबीआय) सरकारला सादर केलेल्या ११२ पानी अहवालात सध्याच्या शिक्षण पद्धतीचे वाभाडे काढले आहेत. गणित आणि इंग्रजी या विषयांवर शाळेत विशेष भर न देण्यात आल्याने कर्मचाऱ्यांकडून साध्या स्पेलिंगमध्ये चुका होणे, गचाळ हस्ताक्षर, तोंडी आकडेमोड न जमणे, संदर्भहीन लिखाण आदींना तोंड द्यावे लागत असल्याचे अहवालात म्हटले आहे. गणित आणि इंग्रजी हे मूलभूत विषयच कच्चे राहिल्यास ब्रिटनमधील नोकऱ्या चिनी आणि भारतीयांच्या ताब्यात जातील, असा इशाराही त्यात देण्यात आलेला आहे.

– 'सकाळ' (पुणे), दि० २२ ऑगस्ट २००६
प्रेषक : **मनोहर राईलकर**

# ‘शमशेरियत’चं ‘सलीलीकरण’ अर्थात शमशेरांच्या कवितांचा सलील वाघांनी केलेला मराठी अनुवाद

**जया परांजपे**

[परीक्षित पुस्तक - ‘विस्कटलेली दुनिया आणि मी’ - शमशेर, अनुवादक - सलील वाघ. प्रकाशक - टाइम ॲण्ड स्पेस कम्युनिकेशन, पुणे. २००५. पृष्ठे ९८. किंमत ७० रु.]

क्रोचेसारख्या प्रसिद्ध चिंतकाने काव्यानुवाद ही मिथ्या कल्पना असून काव्यानुवाद अनुवाद न राहता स्वतंत्र रचना बनते अशी टोकाची भूमिका घेतलेली दिसते. त्यामागे काव्यातील तरल, सांद्र तसेच सूचक भावस्पंदने व संवेदना आणि ती व्यक्त करणारी अनन्यसाधारण काव्यभाषा दुसऱ्या भाषेत जशीच्या तशी पुन्हा उतरविणे वा रूपांतरित करणे, अवघड किंबहुना काहीसं अशक्य कार्य आहे असे सुचविलेले आहे. म्हणूनच काही वेळा काव्यानुवादात मूळ कविता अनुवादकाच्या कल्पनेतून साकारलेलं त्या किंवा तशाच अनुभवाचं वेगळं रचना-शिल्प ठरू शकतं.

या दृष्टीने शमशेर हे हिंदीतील अतिशय वैशिष्ट्यपूर्ण कवी म्हणावे लागतील. त्यांच्या कवितेत भावनांचा व जीवनविषयक चिंतनाचा उत्स्फूर्त सच्चेपणा आणि गांभीर्य आहे, उथळपणा नाही. भाषेला जाणीवपूर्वक दिलेला कलापूर्ण व अत्यंत समर्पक बाज आहे; पण कृत्रिम बटबटीतपणा नाही. रंग-रेषा व गतीतून साकारणारी तरल, सूचक व हृद्य चित्रात्मकता आहे; पण स्थूल वर्णनं नाहीत. या सर्वांमुळेच ‘शमशेरियत’ म्हणून ओळखली जाणारी त्यांची खास शैली आहे, जी अर्थातच अनुवादाच्या दृष्टीने आव्हानात्मक आहे.

सलील वाघ स्वत: कवी आहेत, स्वभाषेत (मराठीत) अनुवाद करीत आहेत व हिंदी-मराठी काव्याचा त्यांचा अभ्यासही आहे. असे असूनही शमशेरांच्या काव्याची आव्हाने पेलून त्यांना मराठी वाचकापर्यंत पोहोचविण्यासाठी सलील वाघांना बरीच कसरत करावी लागलेली दिसते.

या कसरतीतून ‘कवी ढवळून टाकतो’ किंवा ‘शतकाच्या उत्तरायणात’सारख्या निश्चित विचार व जाणिवा देणाऱ्या कवितांचे सुंदर अनुवाद वाचायला मिळतात.

तसेच - ‘आणि चहूबाजूंनी सर्व दिशांनी मोर
साद घालू लागले - पियूअ् ! पियूअ ! पियूअ !
त्यांच्या हिरव्या-निळ्या पाचूंच्या माना
विजेसारख्या हिर्वळीवर झळाळू लागल्या.’ (संध्याभाषा)

किंवा

‘एक मधमाशी झुकांडी देऊन फुलाला
खूप लहानसं फूल
उडून गेली.’ (ओसरीच्या अंगणात उभं उन्हं.)

अशी वाचकाच्या मनात भावचित्रं व स्पंदनं जागवणारी आणि समांतर काव्यलय जपणारी स्थळं अनुवादात आढळतात.

पण या कविता स्वतंत्रपणे वाचताना व खास करून मूळ हिंदी कवितांच्या तुलनेत वाचत असताना खटकणारे संदर्भही आढळतात.

उदाहरणादाखल काहींचा उल्लेख करीत आहे -

- पर्यायी शब्द व वाक्यप्रयोग

मासूमता (मासूमियत), अविरळ (अविरल), माहौल (समाँ), चंदेरी (चिकनी), रेललेली आणि लोळतीय (लेरी हुई), फडफडताहेत (मुस्कुराते), सॉफ्टलाइट गोडसर चहा (हलकी मिठी चाय), प्रपोर्शनेट (कटे-छँटे), सुरेख सैलावलेलं शरीर (सलोना जिस्म), ठाम अंग (ठोस बदन), सुळसुळीत अंग (चिकना बदन), अध:स्फूट अळोखे-पिळोखे (अधखुली अंगडाइयाँ), गळ्यात टाकलेल्या मुलायम हातासारखं लाघवीपण (मुलायम बाँहों सा अपनाव) इ०

अशा ठिकाणी अनुवादकाने योजलेले पर्याय चुकीचे वा बरोबर आहेत हे पाहण्यापेक्षा काव्यातील त्या-त्या ठिकाणचे शब्द व अर्थातील अद्वैत सौंदर्य जपणारे आहेत वा नाहीत हे पाहणे अगत्याचे असते. त्या दृष्टीने हे संदर्भ काव्यास्वादनात बाधक ठरतात.

- ‘पौर्णिमेचा चंद्र’, ‘चंदेरी रुपेरी वाळू’ अशा सारख्या काही कवितांमध्ये अनुवादकाने मुळातील ओळींचा व शब्दचित्रांचा दोन-तीन प्रकारे अनुवाद केलेला आहे. या ठिकाणी मूळ काव्यातील भाव व भाषासौष्ठवाच्या भाषांतरणाच्या मर्यादा समोर येत असल्या तरी हे अनुवाद काव्याच्या एकूण परिणामकारकतेला मारक ठरतात.
- मूळ काव्यातील गाळलेले शब्द, ओळी वा कडवी आणि त्याचबरोबर शब्दांपासून ओळींपर्यंत स्वत:च्या कल्पनेने जोडलेले नवे संदर्भ अनुवादाच्या सीमा ओलांडून स्वैर अनुवादाचे रूप घेतात.

म्हणूनच काव्यानुवादासाठी योजाव्या लागणाऱ्या युक्त्या व बदलांची अपरिहार्यता स्वीकारूनही मूळ कवी वाचकापर्यंत किती पोहोचतो व अनुवादित कविता वाचकाला किती भावते हे प्रश्न इथं शिल्लक राहतात.

या सर्व गोष्टींची जाणीव असल्यामुळेच कदाचित स्वत: अनुवादकाने याला शमशेरांच्या कवितेचे मराठी 'अपभ्रंश' मानले आहेत व प्रस्तावनेत स्पष्ट नमूद केले आहे की 'हा अनुवाद वाचून जर कुणाला शमशेर 'सगळा कळला' असं वाटलं तर ते माझं (आणि वाचणाऱ्याचंही) मोठंच अपयश ठरेल. मात्र कुणाला शमशेर मुळातून वाचायची इच्छा यामुळे झाली तर ते माझं मोठंच यश ठरेल.'

अनुवादकाची ही अपेक्षा सार्थ आहे हे मात्र खरे ! ■

हिंदी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे. दूरभाष (निवास) (020) 2569 4915.

---

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- **'मराठी ग्रंथप्रकाशनाची २०० वर्षे'** - शरद गोगटे. राजहंस प्रकाशन, पुणे. २००८. पृष्ठे १६+४८. किंमत ४०० रु.
- **'ध्वनिताचे केणे'** - मा.ना. आचार्य. पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २००८. पृष्ठे ३२+२८० किंमत २५० रु.
- **'कार्टून कला'** - लेखक आणि प्रकाशक - लछमन हर्दवाणी, अहमदनगर. २००८. पृष्ठे १२+१२३. किंमत १२५ रु.
- **'तलफ'** - हरीष मंगलम् - अनुवादक - सुषमा लेले. सुगावा प्रकाशन, पुणे. २००८. पृष्ठे ११२. किंमत ७० रु.
- **'रुजुवात'** - अशोक रा. केळकर. लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई. २००८. पृष्ठे २४+३१६. किंमत ६०० रु.
- **'स्मृतिगंध'** - (राष्ट्रीय पंडित बा.मा. खुपेरकरशास्त्री : व्यक्ती आणि वाङ्मय) संपादक - प्राचार्य नि.ना.रेळेकर, प्रा० कृष्णा गुरव. प्रकाशक-अशोक गणेश पुरोहित, पुणे. २००७. पृष्ठे : ७२+६५०. किंमत ४०० रु.
- **'राजहंस व्यावहारिक मराठी शब्दार्थकोश'** - मो.वि. भाटवडेकर. राजहंस प्रकाशन, आणि विश्वास ज्ञानप्रबोधिनी अँड रिसर्च इन्स्टिट्यूट, नाशिक. २००७. पृष्ठे १९ + ८५९. किंमत ८०० रु.
- **'अर्थच्छटा कोश'** - मो.वि.भाटवडेकर. स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. २००७ पृष्ठे ४४८. किंमत ३५० रु.

---

- ☐ **'जाहिरातींचे शैलीशास्त्र'** - श्रीपाद भालचंद्र जोशी. श्री मंगेश प्रकाशन, नागपूर.२००७ पृष्ठे ३०८. किंमत १५० रु.
- ☐ **'भाषा घडतांना'** - अविनाश बिनीवाले. गौतमी प्रकाशन, नाशिक. २००७. पृष्ठे १३९, किंमत १३० रु.
- ☐ **'शब्दगन्ध'** - अविनाश बिनीवाले. गौतमी प्रकाशन, नाशिक. २००७. पृष्ठे १६०. किंमत १५०/- रु.
- ☐ **'वाक्यकोश-भाग ३'** - वा.के. लेले. राजहंस प्रकाशन, पुणे. २००७ पृष्ठे २२८. किंमत १०० रु.
- ☐ **'मराठीचा विकास व शिक्षणाचा प्रश्न'** - शांताराम बोकील. प्रकाशक - अभिनंदन बुक डेपो. कोल्हापूर. २००७. किंमत ५० रु.
- ☐ **'भाषिक संघर्षाचे समाजशास्त्र'** - रवीन्द्र केळेकर, अनुवादक - अरुणा दुभाषी. प्रकाशक - राजहंस वितरण, पणजी. २००८. पृष्ठे १७०. किंमत १३५ रु.
- ☐ **'उत्तम अध्यापनाची रहस्ये'** - संपादक : डॉ० विनय किरपाळ, भाषांतर - डॉ० संध्या काणे, प्रस्तावना - डॉ० अशोक रा. केळकर. डायमंड पब्लिकेशन्स, पुणे. २००८. पृष्ठे २३०. किंमत २०० रु.
- ☐ **'मितवा'** व **'निरंतर'** - उषा मेहता. प्रकाशक - ग्रंथाली, मुंबई. २००८. पृष्ठे (अनुक्रमे) ४४ व १७१. किंमत (अनुक्रमे) ५० रु. व २०० रु.
- ☐ **'समीक्षेची वल्कले'** - डॉ० द.भि. कुलकर्णी. पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २००८. पृष्ठे १५२. किंमत १३० रु.
- ☐ **'जीएंची महाकथा'** - डॉ० द.भि. कुलकर्णी. आकांक्षा प्रकाशन, नागपूर. २००८. पृष्ठे १८८. किंमत २२० रु.
- ☐ **'ज्ञानेश्वराची प्रतीतिविश्रांती' ( ज्ञानेश्वरी : नवे आकलन )** - डॉ० द.भि. कुलकर्णी, प्रकाशक - विश्वमोहिनी प्रकाशन व ब्लू बर्ड (इंडिया) लि. पुणे. २००८. पृष्ठे २३२. किंमत २५० रु.
- ☐ **'मनातला झोका'** - सौ० शिवरंजनी कुलकर्णी. विसा बुक्स, नागपूर. २००८. पृष्ठे ५८. किंमत ६० रु.
- ☐ **'इस्लाम आणि पैगंबर मुहम्मद'** - संपादक : मुश्ताक मदनी, ए.आय. मक्की. भाषांतर - एच.एम. खान. उसूल पब्लिकेशन, पुणे. २००८. पृष्ठे १८२. किंमत ५० रु.
- ☐ **'रमजानची उपासना आणि भारतीय संस्कृती'** - अनीस चिस्ती. मावळाई प्रकाशन, शिरूर. २००८. पृष्ठे १८०. किंमत १६० रु.

# परीक्षणांतील शेरेबाजी

नीलिमा गुंडी

'भाषाभान' आणि 'अक्षरस्पंदन' या माझ्या दोन पुस्तकांवर सुमन बेलवलकर *यांनी* 'भाषा आणि जीवन' (वर्ष-२६ अंक-४ पृष्ठे ६७-७६)मध्ये लिहिलेली परीक्षणे वाचली. डॉ० बेलवलकरांनी पुस्तके बारकाईने वाचून त्यांतील काही त्रुटी निदर्शनास आणल्या, याबद्दल मी त्यांची आभारी आहे. मात्र 'अक्षरस्पंदन'मधील माझे हे लेखन 'समीक्षा' या स्वरूपाचे नाही. तसा कोठे उल्लेखही नाही. तरीही ''समीक्षापर लेखनाला एवढे पुरेसे नसते'' असे म्हणत त्यांनी केलेले उद्‌बोधन वाचून मौज वाटली.

(१) माझ्या एका लेखाचे शीर्षक आहे 'निमित्त शाळा'. शीर्षक नीट वाचले तरी कळेल की हे 'शाळा' या कादंबरीचे परीक्षण नाही. हा लेख 'पालकनीती' दिवाळी अंकात 'शाळा' कादंबरीच्या निमित्ताने पौगंडावस्थेतील मुलांच्या प्रश्नांचा वेध घेणारा आहे. तरीही बेलवलकर त्या लेखाचा उल्लेख 'समीक्षण' असाच करतात. त्या लिहितात, ''एका लेखात तर कुसुमाग्रजांच्या 'स्वप्नाची समाप्ती' या प्रसिद्ध कवितेची मजरुह सुलतानपुरींच्या एका चित्रपटगीताशी तुलना केली आहे.'' यातील 'तर' या शब्दातून त्यांना अशा प्रकारच्या लेखनाविषयी वाटणारी नाराजी स्पष्ट कळते. (इतरत्रही त्यांनी कवितांची 'अवतरणे' असे न म्हणता कवितांचे 'तुकडे' असे म्हटले आहे !) ''या दोन कलाकृती अगदी वेगळ्या प्रकारच्या असल्यामुळे त्यांच्यातील तुलना येथे अपेक्षित नाही'' ('अक्षरस्पंदन', पृष्ठ १४२) असे मी स्पष्ट म्हटले आहे. तरीही त्या 'तुलना केली आहे' असे म्हणतात !

(२) वड, पिंपळ, चाफा आणि गुलमोहर अशा 'झाडांना' असेच मी म्हटले आहे. (पाहा : 'अक्षरस्पंदन' पृष्ठ १०८) 'प्रचंड वृक्ष' असे म्हटलेले नाही.

(३) 'प्रेम आणि मरण' या गोविंदाग्रजांच्या कवितेतील झाड 'एकतर्फी प्रेमाचे की मूल्यनिष्ठ जगण्याचे प्रतीक होते ?' असा प्रश्न बेलवलकर विचारतात- याचे उत्तर असे, की 'प्रेम आणि मरण'मधील हे झाड हे मूल्यनिष्ठ जगण्याचेच प्रतीक होते. समर्पणशीलता हे जगण्यातील एक मूल्यच आहे.

(४) 'बापटांचे काव्यलेखन आणि काव्यदर्शन' या शब्दरचनेत बेलवलकरांना ढिलेपणा आढळतो. पण बापट स्वत:च्या काव्यवाचनाच्या कार्यक्रमांना हेतुपूर्वक 'काव्यदर्शन' असे म्हणत.

(५) माझ्या शैलीतील कृदन्तयुक्त रचना (उदा० संस्कार करून जाते. इत्यादी) परीक्षणकर्त्यांना खटकते. त्यांच्यामते ''साहित्यात काय किंवा समीक्षेत काय असे 'जाताजाता' घडून जाण्यासारखे काही नसते.'' त्यांच्या या विधानाशी मी सहमत नाही. मुळात 'करून जाते' म्हणजे 'जाता-जाता करते' हे गृहीतच योग्य नाही. माझ्या मते साहित्याचा मनावर होणारा संस्कार हा - जाताजाता म्हणजे दुय्यम स्वरूपाचा नव्हे ! - तर अजाणतेपणे घडत असतो.

(२) 'भाषाभान'च्या परीक्षणात डॉ० बेलवलकरांनी काही शंका उपस्थित केल्या आहेत. त्याला उत्तर असे आहे :

(१) खेळाची भाषा ही मौखिक स्वरूपाची भाषा असते. तिच्यात प्रादेशिक भेद संभवतात.

(२) बेलवलकरांना लेखातील काही नावे 'अस्वाभाविक' वाटतात. खरे तर 'अस्वाभाविक' असे काही आढळले म्हणजेच ते नोंदवावेसे वाटते.

(३) 'स्मृतिचित्रे' या आत्मचरित्रासाठी 'गाजलेले' हे विशेषण बेलवलकरांना अनुचित वाटते. पण य. रा. दाते संपादित 'महाराष्ट्र शब्दकोश : ३' मध्ये पृष्ठ ९७० वर दिलेला अर्थच मला अभिप्रेत आहे तो असा : गाजणे - प्रसिद्ध असणे, सर्वांना माहीत असणे. ■

**प्रतिसाद २**

# हेही स्वयंपाकघरातून अदृश्य झाले आहेत

**अनिल शेळके**

मराठमोळ्या घरात सणासुदीला पुरणपोळीचे जेवण असेल तेव्हाच दूध (गुळवणी) कढी, येळवणाची आमटी खाण्यासाठी वाट्या असत. दररोजचे जेवण ताटात असे. ताटात भाकरीचे चार तुकडे (चतकोर) वाढलेले असत. ती कोरडी भाकरी लावून खाण्यासाठी, कोरड्यास (भाजी/आमटी/मटनाचा रस्सा) त्याच ताटात वाढलेले असे. घास घेण्यापूर्वी भाकरी कोरड्याशाने भिजून ओली होऊ नये म्हणून टेकण लावलेले असे. हे टेकण आता स्वयंपाकघरातून अदृश्य झाले आहे. ही टेकणे फक्त लाकडाचे तुकडे नसत; सुताराकडून ती सुबक आकारात करून घेतलेली असत. त्यांना 'सोबणी' किंवा 'व्हटकन'ही म्हणत असत.

स्वयंपाकघरात भाजी, आमटी, वरण करण्यासाठी मातीचे लहान भांडे असे. त्यात

खमंग फोडणीही बसत असे. त्या भांड्याला ‘चिटकी’ असे म्हणत. त्यावर त्याच मापाचे मातीचे झाकण असे त्याला ‘लोटके’ म्हणत.

आज स्वयंपाकघरात चूलच नाही, तेव्हा चूल पेटविण्यासाठी असणारी फुकारी किंवा फुंकणी ही नाहीच. मिक्सरग्राइंडरमुळे उखळ गेले. या उखळात पदार्थ कुटण्यासाठी लाकडी मुसळ असे. लांब, थोडीशी सडपातळ पहार असे तर जाड आखूड ठोंबा असे. हेही गेले.

गव्हाची खीर मोठ्या पातेल्यात तयार करताना हटविण्यासाठी (ढवळणे/एकजीव करणे) लाकडी चाटू असे. तर थालीपीठ लावण्यासाठी तसराळे नामक भांडे असे.

पूर्वी कपाटे नव्हती, डबे-बरण्याही नव्हत्या. उन्हाळ्यात तयार केलेल्या भातोड्या, कुरवड्या, सांडगे गाडग्यात भरून त्या गाडग्यांची उतरंड कोनाड्यात उभी केलेली असे. त्यासाठी कोपऱ्यात एक ओटा केलेला असे त्यावर खालच्या मडक्याचे बूड न हलता टेकून राहील असे चिखलाचे एक वर्तुळ केलेले असे त्याला भानवस म्हणत.

आता वस्तू हरवल्या, नावे हरवली ! ■

**‘राम’ 3657, स्टेशन रोड, बार्शी** 413 401. **भ्रमणभाष** 94201 33013.

**प्रतिसाद ३**

## ‘दुर्दर्शनी’ मराठी

मराठीची दुर्दशा दूरदर्शनाने वाढवली आहे. ‘मी तुझी मदत करू शकत नाही, आम्ही त्यांचे धन्यवाद मानतो,’ कोणाचीच नाराजगी ओढून घ्यायला नको, ती लोकं हे मान्य करणार नाहीत, माझा स्वत:वर आत्मविश्वास आहे, पुणे येथून थेट प्रक्षेपण (‘सह्याद्री’ वाहिनी रविवार स. ९.३०), चालढकल केल्या जाते, मी जेवण करते, ३१/८ तुम्ही जेवून जा (स्वयंपाक) गणपतीच्या विविध मूर्त्या इथे मिळतात. (‘मी मराठी’ - ६/९/०९ दु. १.४५) ही झाली फक्त काही उदाहरणे. शोधा म्हणजे खूप सापडतील. नव्हे, फार शोधायला लागणारच नाही.

**क.कृ. क्षीरसागर**, 1294, शुक्रवार पेठ, पुणे 411 002.
**भ्रमणभाष** 94220 80865.

■

प्रतिसाद ४

# ‘अर्थ’ आणि ‘सुरू’

रमेश पानसे

लीला दीक्षित यांच्या लेखात ‘नाण्याला फक्त ‘अर्थ’ असतो.’ असा उल्लेख आहे. तो बरोबर वाटला नाही. नाण्याला केवळ ‘संकेत’ असतो. तो संख्यात्मक असतो. तो नाण्याचा ‘अर्थ’ नसतो.

अलीकडे ‘सुरू’ हा शब्द सर्वच प्रसार माध्यमातून सर्रास चुकीचा वापरला जातो, असे आढळते. या अंकात आतल्या मलपृष्ठावर शुभांगी रायकर यांचा परिचय देताना, त्यांचे.. भाषांतर करण्याचे काम ‘सुरू’ आहे, असे म्हटले आहे. वास्तविक तेथे ‘चालू आहे’ असे म्हणावयास हवे. भाषांतराचे काम सुरू एकदाच झाले. मग चालू राहिले.■

1452, रविवार पेठ, वाई, जि. सातारा

प्रतिसाद ५

# ‘ॲ’ की ‘ऍ’ ?

विजय पाध्ये

यास्मिन शेख ह्यांनी ‘मराठी प्रमाणभाषेचे लेखननियम’ ह्या लेखाद्वारे सध्याच्या वर्णमालेत काही बदल करावेत अशी सूचना केली आहे. ह्या संदर्भात काही माहिती व एक सूचना :

१. माझ्या माहितीप्रमाणे आता नवीन (सुधारित) वर्णमाला जवळजवळ तयार झाली असून त्यात हा स्वर सध्याच्या ‘ॲ’ऐवजी ‘ऍ’ असा लिहिला जाणार असून त्याचे स्थान भाषावैज्ञानिकांच्या सल्ल्यानुसार ‘ए’ व ‘ऐ’ ह्यांच्यामध्ये दिलेले आहे. त्याचप्रमाणे, ‘ऑ’ हा स्वर नवीन वर्णमालेत सध्याच्या ओ व औ ह्यांच्यामध्ये समाविष्ट करण्यात आला आहे.

२. ‘अं’ आणि ‘अः’ हे स्वर नसल्याने त्यांना सध्याच्या स्वरमालेतून काढून टाकावे व त्यांचा उल्लेख अनुस्वार (शीर्षबिंदू) चिन्ह आणि विसर्गचिन्ह दर्शवून करावा असे सुचवले गेले आहे, पण ही चिन्हे वर्णमालेत नेमक्या कोणत्या ठिकाणी असावीत? मराठीत इतर अनेक (उदा० चरणदंड, अवग्रहचिन्ह) चिन्हे वापरली जातात ती वर्णमालेत कधीच दर्शविलेली नसतात, ती वर्णमालेतच योग्य अशा जागी का समाविष्ट केली जाऊ नयेत ? जर ती समाविष्ट केली गेली तर त्याच चिन्हमालेत अनुस्वार (शीर्षबिंदू) व विसर्गचिन्ह आपोआपच स्थान दिले जाईल. त्यांचा क्रम भाषावैज्ञानिकांनी ठरवावा. ■

## प्रतिसाद ६

**रावसाहेब काळे**

माझ्या लेखात [अंक : २६:४ (दिवाळी २००८)] कृपया पुढील दुरुस्त्या कराव्यात.

| पृष्ठ | ओळ | चूक | बरोबर |
|---|---|---|---|
| ८३ | खालून ६ | अथो | अथी |
| ८३ | खालून ४ | कुकूळे | कुकूळे |
| ८४ | खालून २ | मचना | मयना |
| ८४ | (शेवटचा शब्द) | जळे | लळे |

■

आधुनिक मराठी गद्यशैली इंग्रजी संस्कृतीच्या हिंदू संस्कृतीशी एकोणिसाव्या शतकात झालेल्या संपर्कातून विकसित झाल्याचे दिसते. त्याआधी तेराव्या शतकात व नंतर शिवकालोत्तर मराठीत समर्थ गद्यलेखन होते. एकोणिसाव्या शतकातही १८५७पर्यंत 'ईस्ट इंडिया कंपनी'च्या काळात देशी भाषांतूनच व्यवहार व्हावेत, अशा इंग्रजांचा कटाक्ष होता. १८५७ नंतर इंग्रज सरकार देशी भाषांबाबत उदासीन झाले आणि शिक्षणक्षेत्रात घुसलेल्या स्वार्थी लोकांनी इंग्रजीचा ठेका घेतला, तो आजपर्यंत सोडलेला नाही. इंग्रजी टिकवण्यामागे आजही ह्या वसाहतवादी, साम्राज्यवादी प्रवृत्ती आहेत, फरक एवढाच, की ह्या प्रवृत्ती इंग्रजांऐवजी आता मूठभर असलेले नोकरमाने, शहरी-उपरे, परप्रांतीय आणि कारकुनी वृत्तीचे लोक टिकवीत आहेत. ह्यात एक मोठे सांस्कृतिक अध:पतन राजरोसपणे चाललेले दिसते. लहानपणीच कोवळ्या लेकरांना इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये घालून त्यांना बौद्धिक पंगुत्व आणण्याची ही क्रिया कोणत्याही मानवी मूल्यांना धरून नाही. इंग्रजीच्या ह्या समाजातल्या अस्तित्वानेच आपल्या लोकांच्या उपजत कल्पनाशक्तीचा नाश होत आला आहे. युनेस्कोने सर्व स्वतंत्र राष्ट्रांना पाठवलेल्या खलित्यात (१९५३) प्राथमिक शिक्षण तरी मातृभाषेतूनच दिले जावे, असे बजावलेले असूनही स्वार्थी, व्यापारी मनोवृत्तीचे लोक इंग्रजी टिकवून धरीत आहेत. परभाषा ह्या 'लायब्ररी लँग्वेजेस' म्हणून आणि स्वभाषेला विचारांचा पुरवठा करणाऱ्या म्हणून शिकवल्या जाव्यात, हे धोरण जोपर्यंत आपल्या सरकारला आणि लोकांना मान्य होत नाही, तोपर्यंत मातृभाषेच्या विकासाची दुर्दशा थांबणे अशक्य आहे.

**भालचंद्र नेमाडे**

'लिखित भाषा' ('साहित्याची भाषा' ह्या पुस्तकातील परिशिष्ट एक)

प्रेषक : विजय पाध्ये, ३१ मे [illegible]

## लेखक परिचय

- उमाकांत रामचंद्र **कामत :** एम.ए.,एम.एड. अलिबाग, मालेगाव, पालघर येथील महाविद्यालयांत मराठी, शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र या विषयांचे निवृत्त अध्यापक. चार पुस्तके प्रकाशित.
- डॉ० उमा विरुपाक्ष **कुलकर्णी :** एम.ए. (आर्ट अँड पेंटिंग), पीएच.डी. (भारतीय मंदिर शिल्पशास्त्रातील द्रविड शैली). 'केतकर वहिनी' (तीन आवृत्त्या)ही स्वतंत्र कादंबरी. या शिवाय कन्नडमधून मराठीत अनुवादित २१ कादंबऱ्या, तीन कथासंग्रह, पाच नाटके आणि दोन आत्मचरित्रे प्रकाशित. त्यांपैकी अनेकांच्या दोनपेक्षा अधिक आवृत्त्या. तीन अनुवाद प्रकाशनाच्या मार्गावर. ई-टीव्हीवरील 'सोनियाचा उंबरठा' व 'मंथन' या मालिकांचे संवाद-लेखन. अनेक भागांची दोन नभोनाट्ये. साहित्य अकादमीचा अनुवाद-पुरस्कार व महाराष्ट्र शासनाचा 'महाराष्ट्रभूषण' पुरस्कार यांसह एकूण १३ पुरस्कार.
- हेमा **गाडगीळ :** संस्कृत व जर्मन या भाषांमध्ये एम.ए. वयाच्या नवव्या वर्षापासून रोहिणी भाटे यांच्याकडे नृत्याचे शिक्षण. युरोप व अमेरिकेत अनेक वर्षे वास्तव्य. चित्रकला, संगीत व स्थापत्य या कलांची आवड. डोअर-स्टेप स्कूल व कागद-काच-पत्रा कष्टकरी संघटना यांच्याशी निकटचा संबंध.
- डॉ० नीलिमा **गुंडी :** स.प.महाविद्यालय (पुणे) येथे मराठीचे अध्यापन, 'आभाळाचा फळा' व 'कानामात्रा' या दोन बालकवितासंग्रहांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार. 'प्रकाशाचे अंग' या काव्यसंग्रहाला इचलकरंजीच्या आपटे वाचनमंदिराचा पुरस्कार. 'कविता विसाव्या शतकाची'च्या सहसंपादक. 'भाषाभान', 'अक्षरस्पंदन' व 'लाटांचे मनोगत' ही अन्य पुस्तके.
- डॉ० **उज्ज्वला जोगळेकर :** एम्.ए. (फ्रेंच) पुणे विद्यापीठ, एम्.लिट्. (फ्रेंच) केंद्रीय इंग्रजी व परकीय भाषा संस्था, हैदराबाद : पीएच.डी. (फ्रेंच) पुणे विद्यापीठ. प्रबंधाचे शीर्षक 'फ्रेंच व मराठीतील रोखदर्शक उभयान्वयी अव्ययांचा तौलनिक अभ्यास'. 'पुणे विद्यापीठाच्या व अलिआँस फ्रांसेजच्या फ्रेंच भाषावर्गांत अध्यापन. मुंबई विद्यापीठात आठ वर्षे अधिव्याख्याता.' सध्या पुणे विद्यापीठात प्रपाठक. 'केल्याने भाषांतर'मधे वेळोवेळी लेखन. पुणे आकाशवाणीवर प्रासंगिक करारावर निवेदक १९८८-२०००.
- डॉ० प्रियदर्शिनी **तडकोडकर :** गोवा विद्यापीठाच्या कोंकणी अध्यापन व संशोधन विभागात सिलेक्शन ग्रेडमधील अधिव्याख्याता.
- डॉ० ब्रह्मानंद **देशपांडे :** महामहोपाध्याय. विद्याभूषण. प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.
- डॉ० जया **परांजपे :** एम.ए.,पीएच.डी., पुणे विद्यापीठाच्या हिंदी विभागात प्रपाठक. हिंदी नाटकावर दोन पुस्तके प्रकाशित.
- विजय **पाध्ये :** पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८ पासून उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन, औद्योगिक संबंध, विकृतिशास्त्र, दूरसंचार इ० क्षेत्रांतील दस्तावेजांचे इंग्रजीतून मराठीत भाषांतर करण्याचे काम स्वतंत्रपणे करतात.



अनुक्रमणिका

- डॉ० रमेश **पानसे :** अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक. ठाणे जिल्ह्यातील आदिवासी भागात विकास व शिक्षणविषयक प्रयोग. अर्थशास्त्र, समाजकार्य व शिक्षण या विषयांत ग्रंथलेखन. २५पेक्षा अधिक स्वतंत्र व संपादित पुस्तके. 'शिक्षणपत्रिका' मसिकाचे संपादक. 'बाल-शिक्षण संशोधन व विकासकेंद्रा'चे संचालक. सामाजिक कार्यासाठी अनेक पुरस्कारांनी सन्मानित. महत्त्वाचे ग्रंथ - 'शिक्षण आनंदक्षण', 'कर्ता-करविता : आधुनिक मेंदुसंशोधन व आपले जीवन', 'शिक्षण : सामाजिक परिवर्तनाची चळवळ' इ०

- डॉ० सुमन **बेलवलकर :** शिवाजी विद्यापीठातून एम.ए.,पीएच.डी. सर्व परीक्षांत प्रथम क्रमांक व अनेक पारितोषिके. राष्ट्रीय शिष्यवृत्तीने सन्मानित. पश्चिम विभागीय भाषाकेंद्र (पुणे) येथे अमराठी विद्यार्थ्यांना मराठीचे अध्यापन. तेथील प्राचार्यपदावरून निवृत्त. 'बेलभाषा' (भाषाविषयक स्फुटलेखन) व 'मराठी शारदियेच्या चंद्रकळा' (संपादन) ही पुस्तके प्रकाशित.

- प्रकाश अर्जुन **भामरे :** एम.ए.,बी.एड.,एम.फिल. सेट व नेट परीक्षा उत्तीर्ण. मराठी विभाग प्रमुख. ग.तु. पाटील महाविद्यालय. नंदुरबार. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळाचे सभासद. प्रथम व द्वितीय वर्ष, कला आणि प्रथम वर्ष वाणिज्य यासाठीच्या पाठ्यपुस्तक संपादन मंडळांचे सभासद. सामाजिक कार्यात सहभाग.

- डॉ० शंकर **सखाराम (पाटील) :** एम.ए.,बी.एड., आचार्य व मराठे महाविद्यालय(चेंबूर) येथे मराठीचे अध्यापन. चित्रकार, मुद्रितशोधक, आकाशवाणी-मान्यताप्राप्त गीतकार, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या पाठ्यपुस्तकांत संपादक म्हणून सहभाग. दलित ग्रामीण शब्दकोशाच्या संपादक मंडळाचे सभासद. अनेक नियतकालिकांत स्तंभलेखन. तीन कादंबऱ्या, दोन कवितासंग्रह, तीन कथासंग्रह. तीन ललित-लेखसंग्रह, सहा बालकथासंग्रह आणि तीन बालकवितासंग्रह प्रकाशित. अनेक पुरस्कार.

## आवाहन

(१) **परिषदेचे संकेतस्थळ :** दि. १ मे २००८ रोजी परिषदेचे संकेतस्थळ सुरू झाले आहे. त्याचा पत्ता **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळावर परिषदेची घटना, पदाधिकारी, कार्यक्रमांची छायाचित्रे, 'भाषा आणि जीवन'चे अंक, सभासदवर्गणी इत्यादी माहिती उपलब्ध आहे. सभासदांनी या संकेतस्थळावरील मजकुराचे परिशीलन करावे. आपला अभिप्राय कळवावा आणि सूचनाही कराव्यात.

(२) मराठी अभ्यास परिषदेच्या आजीव सदस्यांनी तसेच वर्गणीदारांनी आपला **e mail** चा पत्ता कृपया कळवावा. त्यामुळे आपल्याशी संपर्क साधणे सुलभ होईल.

